## प्रकरण पहिलें : : काका

### १

सतीशला मीं अगदीं प्रथम ज्या वेळीं पाहिलें त्या वेळीं, त्याचे ते तळपणारे डोळे, अग्निशिखेप्रमाणें निमुळतीं बोटें आणि तारुण्याच्या तेजानें तळपणारा चेहरा पाहून माझ्यापुढें एक तारकापुंजच मी पाहतों आहें असें मला वाटलें. त्याच्या बरोबरीच्या बहुतेक विद्यार्थ्यांना तो आवडत नसे याचें मात्र मला राहून राहून नवल वाटे. कारण त्याचा दोष म्हणून म्हटलाच तर, त्याचें इतरांशीं साम्य असें मुळींच नव्हतें. त्याचा तो अगदीं निराळा दिसत व वागत असे, एवढाच. बाकी कदाचित् असें असावें कीं इतर जीव-सृष्टींतल्याप्रमाणें मनुष्यामध्यें सुद्धां भोंवतालच्या परिस्थितीच्या रंगारूपाप्रमाणें रंगरूप घेणें हाच स्वसंरक्षणाचा अत्युत्तम मार्ग असावा.

मला सतीशबद्दल आदर वाटतो हें आमच्या वसतिगृहांतील विद्यार्थ्यांना अर्थातच सहज दिसून येण्यासारखें होतें. मात्र ही गोष्ट त्यांना आवडत मुळींच नसे. त्यासाठींच माझ्या देखत सतीशची निंदा करण्याची एकहि संधि ते वायां जाऊं देत नसत. परंतु डोळ्यांत जर केराचा एखादा कण गेला तर डोळा न चोळणें हेंच योग्य. त्याच न्यायानें, जर कोणीं आपल्याला लागून बोललें तर त्याला उत्तर देऊन कोळसा उगाळण्यापेक्षां कांहीं उत्तर न देणें हा मार्ग सर्वोत्तम.

अशाच विचारानें जरी मी वागत असें तरीहि, एके दिवशीं सतीशची निंदा त्यांनीं इतक्या वाह्यातपणानें केली कीं, माझ्याच्यानें कांहीं स्वस्थ बसवलें नाहीं.

पण मौज मात्र अशी कीं, तसें पाहिलें तर सतीशबद्दल जवळ जवळ कांहींच माहिती मला नव्हती. माझें त्याचें यापूर्वी कधीं बोलणें चालणें सुद्धां झालेलें नव्हतें. उलट आमच्या बरोबरीच्या इतर विद्यार्थ्यांपैकीं कित्येकजण त्याच्या घरोब्याचे–शेजारी, आणि कांहींजण तर त्याचे, लांबून का होईना, पण नातेवाईक होते. ते जोरजोरानें प्रतिपादीत होते कीं, सतीशबद्दल आम्ही

जें म्हणतों तेंच खरें आहे; आणि मी त्याहूनही जास्त जोरानें म्हणत होतों कीं, त्यांचें म्हणणें हें अगदीं साफ खोटें आहे. शेवटीं सगळेच विद्यार्थी माझ्याविरुद्ध जणूं अस्तन्या वर सारीत आंगावर येऊन ओरडले, " तूं तरी कोण रे एवढा ढुङ्गाचार्य असें म्हणणारा ? आंऽऽ ... ! "

त्या दिवशीं रात्रीं माझ्या मनाचा खरोखर इतका कांहीं भडका उडाला कीं, शेवटीं माझ्या डोळ्यांत पाणी आलें. दुसरे दिवशीं कॉलेजांत एक मोकळा तास होता. सतीश त्या वेळीं कॉलेजच्या मैदानांत हिरवळीवर खुशाल आडवा होऊन, निजल्या निजल्याच कांहीं वाचीत होता. मी हळूच त्याच्याजवळ गेलों आणि नमस्कार चमत्काराची कसलीही भाषा न करतां त्याच्यापुढें माझ्या मनांतील सगळा संताप मीं गोंधळत, अडखळत ओकून टाकला. संतापाच्या भरांत मी काय बोलतों नि काय नाहीं याचें-सुद्धां मला नीटसें भान नव्हतें.

सतीशनें पुस्तक मिटलें आणि एकवार माझ्याकडे निरखून पाहिलें. त्याच्या त्या दृष्टीचा माझ्या मनावर कसा आणि केवढा ठसा उमटला असेल हें, त्याचे डोळे प्रत्यक्ष ज्यांनीं कधीं पाहिलेले नाहींत त्यांच्या केव्हांच ध्यानांत येणें शक्य नाहीं. तशीच माझ्याकडे नजर रोखून सतीश म्हणाला, " हे लोक माझी जी ही अशी निंदा करतात ती खरें काय आहे हें समजून घेण्याची त्यांना आवड आहे म्हणून का ? नव्हे. तर माझ्याबद्दल वाईट ग्रह करून घेण्याची त्यांना आवड आहे म्हणून. तेव्हां ते जे या कंड्या उठ-वितात त्यांमध्यें तथ्य नाहीं हें सिद्ध करीत बसण्यापासून कांहीं एक फायदा नाहीं. "

त्यावर मीं म्हटलें, " पण असे जे खोटें बोलणारे लोक आहेत त्यांना—"

" पण ते खोटें बोलणारे नाहींतच. " मला मध्येंच अडवून सतीश म्हणाला.

किंचित् थांबल्यासारखें करून तो पुढें म्हणाला, " आमच्या शेजारीं एक गृहस्थ रहात असे. त्याला मधून मधून वाताचे झटके येत असत. गेल्या थंडीच्या दिवसांत मी त्याला एक चांगली धाबळी घेऊन दिली. पण माझ्या गड्याला कांहीं हें पटलें नाहीं. तो तावातावानें माझ्याकडे येऊन म्हणूं लागला कीं, ' या माणसावर काय तुम्ही विश्वास ठेवतां ! अहो, दुखण्याचें हें सारें त्याचें

ढोंग आहे.' माझी निंदा करतात त्या विद्यार्थ्यांची गत या माझ्या गड्यासारखी आहे. ते जें म्हणतात तें अगदीं खरें आहे असेंच खरोखर त्यांना अगदीं मनापासून वाटत असतें. दैवयोगानें मलाहि एक धावळी जरूरीपेक्षां अधिक मिळालेली आहे असें त्यांना वाटत असावें. आणि ती आपल्याला मिळाली तर जास्त चांगलें झालें असतें अशी त्यांची भावना असावी, एवढेंच."

शेवटीं धीर करून मीं त्याला एक स्पष्टच प्रश्न टाकला, "पण ते म्हणतात कीं तुम्ही नास्तिक आहांत; मग हें तरी खरें आहे का?"

त्यानें उत्तर दिलें, "होय."

शरमेनें मान खालीं घालून उभें राहण्याची पाळी आली माझ्यावर. माझ्या बरोबरीच्या विद्यार्थ्यांशीं आदल्या दिवशीं रात्रीं मी मोठ्या जोरानें हुजत घालीत होतों कीं सतीश नास्तिक असणें संभवनीय नाहीं. त्या साऱ्या हुजतीचें आतां कसें काय?

सतीशचा माझा परिचय होत असतांना सुरुवातीलाच मला दोन चांगलेच टोले खावे लागले. माझी समजूत होती कीं सतीश ब्राह्मण आहे. पण तो निघाला वैश्य जातीचा! आणि माझ्यामध्यें तर अगदीं पवित्र सनातनी ब्राह्मण कुळाचें रक्त सळसळत असलेलें! तेव्हां माझ्या अंगीं वैश्यांबद्दल स्वाभाविकच तिरस्कार मुरलेला! तसेंच नास्तिक माणसें म्हणजे खुनी माणसांपेक्षां, एवढेंच काय, पण प्रत्यक्ष गोमांसभक्षकांपेक्षांहि नष्ट लोक होत अशींहि कल्पना माझ्या अंतःकरणांत तेव्हां अगदीं खोल रुजलेली होती.

तेव्हां एखाद्या वैश्याच्या मुलाबरोबर मी सहभोजन करीन किंवा नास्तिकवादी पंथाबद्दलच्या उत्साहाचें वारें माझ्या ठिकाणीं गुरूच्याहूनही अधिक उसळेल ही गोष्ट स्वप्नांतसुद्धां कोणाला खरी वाटण्यासारखी नव्हती. परंतु या दोन्ही गोष्टी प्रत्यक्ष घडून तर आल्या खऱ्या.

आमच्या कॉलेजामध्यें विल्किन्स हे आमचे प्रोफेसर होते. त्यांची विद्वत्ता जितकी मोठी तितकाच त्यांचा आम्हां विद्यार्थ्यांबद्दलचा तिरस्कारही प्रबळ होता. बंगाली विद्यार्थ्यांना साहित्याचे धडे देत बसणें म्हणजे निव्वळ हमाली करणें आहे असें त्यांना वाटे. आणि म्हणूनच आम्हांला शेक्सपीअर शिकवीत असतांनासुद्धां Cat म्हणजे 'बिडाल जातीचा एक चतुष्पाद प्राणी' इतका साधा शब्दार्थसुद्धां ते आम्हांला सांगत बसत व

उतरून घ्यायला लावीत. पण सतीशला मात्र वर्गात कांहींही लिहून न घेण्याला त्यांची मुभा होती. उलट ते त्याला म्हणत, "तुझा येथें वेळ फुकट जातो. पण माझ्या खोलीवर त्याची भरपाई करून देईन मी तुला."

प्रोफेसर महाशय सतीशला या अशा सवलती देतात आणि जास्त सलगीनें वागवितात याचें कारण त्याचा गोरा रंग आणि त्याचा नास्तिक वादावरचा विश्वास, दुसरें कांहीं नाहीं, असें इतर ज्या विद्यार्थ्यांवर साहेबांची विशेष मर्जी नसे ते म्हणत. त्यांतल्या त्यांत ज्यांना आपल्या व्यवहार-चातुर्याबद्दल अभिमान वाटत असे असे विद्यार्थी विल्किन्स साहेबांच्या खोलींत जाऊन तात्त्विक अभ्यासाबद्दल आपल्याला विशेष आस्था आहे असा आव आणीत आणि जडवादाबद्दलचें एखादें पुस्तक वाचायला द्या असें म्हणत. परन्तु 'तुम्हांला त्यांत कांहीं समजणें शक्य नाहीं' असें म्हणून साहेब पुस्तक देण्याचें नाकारीत. तेव्हां नास्तिकवादाचा अभ्यास करण्याची सुद्धां आमची लायकी नाहीं असें साहेबांनीं समजावें, या विचारानें तर सतीशबद्दलच्या त्यांच्या द्वेषभावनेंत जास्तच तीव्रता वाढत जाई.

## २

जगमोहनबाबू हे सतीशचे काका. त्या काळचे हे एक प्रख्यात नास्तिक-वादी गृहस्थ. त्यांची परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दल खात्री नव्हती एवढें म्हणून भागण्यासारखें नव्हतें; तर परमेश्वर मुळीं नाहींच अशी त्यांची पक्की खात्री होती. आरमारामध्यें कप्तानाचें खरें काम म्हटलें म्हणजे सुकाणू मारून जहाजें बचावण्याऐवजीं जहाजें बुडविणें हेंच असतें, हें जसें आपण पहातों त्याचप्रमाणें जेथें जेथें आस्तिक्यवाद डोकें वर काढूं पाहील तेथें तेथें त्याला खालीं पाण्यांत बुडवून टाकणें हा जगमोहनबाबूंचा एक प्रमुख उद्योग होऊन बसलेला होता.

त्यांची वादाची दिशा ही अशी होती :

(१) परमेश्वर आहे असें तुम्ही म्हणतां ना ?

तर मग आपली ही बुद्धि त्याच्यापासून निर्माण झाली असली पाहिजे.

( २ ) पण आपली बुद्धि तर आपल्याला अगदीं स्पष्टपणें सांगते कीं परमेश्वर बिरमेश्वर कांहीं कोठें नाहीं.

( ३ ) तेव्हां मग तुमच्याच म्हणण्याप्रमाणें असें झालें कीं, प्रत्यक्ष परमेश्वराचेंच आपल्याला सांगणें आहे कीं, जगांत परमेश्वराचें अस्तित्व नाहीं.

आणि तरीसुद्धां तुम्ही हिंदु लोक परमेश्वर आहे असें मानतां आणि खुद्द परमेश्वराचा अवमान करतां. याच तुमच्या पापाबद्दल शिक्षा म्हणून तेहतीस कोटी देवदेवता तुमचे कान पकडून ते चांगले पिरगाळीत आहेत.

जगमोहन बाबूंचें लग्न पुष्कळ लहानपणीं झालें होतें; पुढें त्यांची पत्नी निवर्तली. पण त्याआधींच माल्थसचे ग्रंथ त्यांच्या वाचण्यांत आले होते. म्हणून ते दुसऱ्यांदां विवाहाच्या भानगडींत पडले नाहींत.

हरिमोहन बाबू हे जगमोहनांचे धाकटे बंधु. हे सतीशाचे वडील. हरिमोहन आणि जगमोहन या दोघांच्या स्वभावांत इतका कांहीं विरोध होता कीं केवळ माझी ही गोष्ट सजविण्यासाठीं कांहींतरी बनावट तयार करून मी सांगतों आहें अशी त्या विरोधवर्णनावरून वाचकांची समजूत होण्याचा संभव आहे. पण खरें पाहिलें तर कथा—कादंबऱ्यांनाच वाचकांची श्रद्धा वर्णन केलेल्या प्रसंगांवर कशी बसेल यासंबंधीं फार काळजी घेऊन चालावें लागतें; प्रत्यक्ष वस्तुस्थितीला अशी कोठली फिकीर? वस्तुस्थितीवर आम्ही कितीही जरी अविश्वास दाखविला तरी वस्तुस्थितीमुळें आमचेंच उलट हंसें होणार. तेव्हां तात्पर्य काय कीं, दोघा भावाभावांत अगदीं सकाळ आणि संध्याकाळ यांच्या मधल्या इतकें अंतर असल्याचें जगांत कित्येकदां आढळून येत असतें. ही प्रत्यक्ष वस्तुस्थिति आहे. तिच्या पुढें कोणाचें काय चालणार!

बालपणीं हरिमोहनांची प्रकृति जरा अशक्त असे. तेव्हां त्यांना कसल्या दुखण्याची बाधा होऊं नये म्हणून त्यांच्या आईबापांनीं मंत्रतंत्र, गंडेदोरे, अंगारेधुपारे, आणि मोठमोठ्या पवित्र ब्राह्मणांचे आशीर्वाद यांचा भला थोरला किल्लेकोट त्यांचे भोंवतीं उभारला होता; व त्यासाठीं पुष्कळसा खर्चही केला होता. पुढें हरिमोहनबाबू जसे मोठे झाले तशी त्यांची अंगकाठी चांगली मजबूत झाली. तरीपण त्यांची प्रकृति अगदी अशक्त आहे

ही जी कल्पना त्यांच्या लहानपणीं एकदां सुरू झाली तिची परंपरा मात्र त्यांच्या कुटुंबांत तशीच्या तशीच पुढें चालू राहिली. त्यामुळें त्यांनीं कांहीं तरी धंदा उद्योग करावा असें कोणी म्हणायला धजत नसे. कांहीं न करतां का होईना, पण धडपणें त्यांनीं आपली काळक्रमणा करावी म्हणजे गंगेंत घोडे न्हायले, अशीच साऱ्यांची समजूत झालेली. कांहीं न करतां काळ कंठण्याची आपल्या आयुष्यांतील ही मोठीच जबाबदारी हरिमोहनांनीं अगदीं चोखपणानें पार पाडली; आणि यमदूतांची सावलीसुद्धां कधीं आपल्या जवळ येऊं दिली नाहीं.

तथापि इतर लोकांच्या मानानें आपल्या आयुष्याचा धागा फारच दुर्बळ आहे, अर्थात् आपले प्राण सदैव धोक्यांत आहेत अशी हाकाटी आपल्या कुटुंबांतील माणसांपुढें क्षणोक्षणीं करायला मात्र हरिमोहन चुकत नसत. यासाठींच आपली आई, चुलत्या, माम्या या सगळ्यांचें लक्ष केवळ एक आपल्याकडेच असावें, त्यांनीं आपल्या प्रकृतीला जुळण्यासारखे खास स्वतंत्र पदार्थ तयार करून ते आपल्याला वाढावे याबद्दलही त्यांचा कटाक्ष चालू असे. अर्थातच घरांतल्या इतर मंडळींच्या मानानें आपल्याला विशेष कांहीं काम न पडतां भरपूर विश्रांति मिळावी याविषयींही ते चांगले दक्ष असत. त्यांची आई आणि वर सांगितलेल्या चुलत्या आणि माम्या आपली काळजी घेतात म्हणून एवढेंच नव्हे तर स्वर्ग, भूमि व पाताळांतील असंख्य देवदेवतांची कृपा आपल्यावर आहे म्हणूनच आपली धडगत आहे या विचाराचा त्यांना केव्हांहि विसर पडूं नये अशाच रीतीनें जें तें माणूस त्यांचेशीं वागत असे. स्वाभाविकच या जगांतील जी जी म्हणून सत्ताधारी व्यक्ति किंवा संस्था असेल तिच्यापुढें हात जोडून दुबळ्या भावानें उभें राहण्याचें त्यांच्या मनोवृत्तीला वळणच लागून गेलें होतें. यांमध्यें पोलीस अंमलदार, श्रीमंत शेजारी, लहानमोठे हुद्देदार अधिकारी यांचासुद्धां समावेश व्हायचा. मग पवित्र गोमाता व ब्राह्मण यांच्या विषयींचें त्यांच्या मनावर केवढें दडपण असेल हें तर विचारायलाच नको.

जगमोहनांच्या अंतःकरणाला मात्र याहून अगदीं वेगळयाच प्रकारच्या काळजीनें घेरलेलें असे. सत्ताधारी लोकांच्या ते वाऱ्यालासुद्धां उभे राहत नसत. कारण शिष्टपणाचा–झब्बूशाहीचा–वाससुद्धां आपल्या ठायीं नसावा

याबद्दल ते फार जपत असत. देवदेवतांचा ते जे उपहास करीत त्याच्या मुळाशींही याच त्यांच्या भावनेचें बरेंचसें प्राबल्य होतें. कोणाकडून कांहीं कल्याण होतें यासाठीं त्यापुढें वांकावें हें त्यांच्या वृत्तीला ठाऊकच नव्हतें. त्यांच्या शरीराला ताठपणाची इतकी संवय झालेली होती कीं, अशा कोणापुढें गुडघे वांकणें हें त्यांच्या शरीराला अशक्यच होऊन गेलें होतें.

हरिमोहनांचें लग्न योग्य काळीं—म्हणजे खरें म्हटलें तर योग्य काळाच्या कितीतरी पूर्वीं झालें. तीन बहिणी आणि तीन भाऊ यांच्या पाठीवर त्यांच्या घरीं सतीशचा जन्म झाला. सतीश जगमोहनबाबूंच्या सारखा इतका कांहीं दिसूं लागला कीं सगळ्यांनाच मोठें नवल वाटे. जगमोहनांना पण त्याचा फार लळा लागून त्याला स्वतःचा मुलगाच मानून ते त्याचें लालनपोषण करूं लागले.

पहिल्या प्रथम हरिमोहनबाबूंना फार बरें वाटलें. कारण जगमोहनबाबूंची आपल्या काळचे एक सर्वांत श्रेष्ठ विद्वान् गृहस्थ अशी ख्याति होती. तेव्हां त्यांच्या सहवासांत सतीशच्या शिक्षणाची आयतीच चांगली सोय होते हा त्यांत फार मोठा फायदा होता. जगमोहनबाबू म्हणजे जणूं कांहीं आपल्या इंग्रजी पुस्तकांतला एक किडाच. प्रवाहाच्या पात्राची दिशा जशी दोन्ही बाजूंच्या दगडा—गोट्यावरून शोधून काढतां येते त्याचप्रमाणें जगमोहनांची खोली कोणती हें शोधून काढण्याचें एक सोपें आणि अचूक साधन होतें; भिंतीशीं पुस्तकांच्या रांगाच रांगा कोठें उभ्या आहेत हें पाहिलें म्हणजे झालें.

पुरंदर हा हरिमोहनांचा सर्वांत वडील मुलगा. त्याचे मनसोक्त लाड करून हरिमोहनांनीं त्याला फार बिघडवून टाकलेलें होतें. पुरंदरानें एखादी गोष्ट मागितली आणि आपण त्याला नाहीं म्हटलें तर त्याचा त्याच्य नाजूक प्रकृतीवर काय परिणाम होईल आणि काय नाहीं अशी भलतीच भीति त्यांनीं आपल्या मनांत उत्पन्न करून ठेवली होती. अर्थातच पुरंदराच्या शिक्षणाची आबाळच झाली; त्यांतच अगदीं लहानपणींच त्याचें लग्नही उरकून घेण्यांत आलें. पण लग्न झालें म्हणून कांहीं विवाहबंधनाचें पावित्र्य संभाळून त्यानें आपल्या विषयतृप्तीचें क्षेत्र घराच्या बाहेर जाऊं देऊं नये ही गोष्ट साधण्याचें कांहीं कोणाला जमलें नाहीं. उलट आपल्या नव-

त्याच्या अशा या चाळ्यांबद्दल जर पुरंदराच्या बायकोनें कधीं नापसंति दाखविली तर हरिमोहन उलट तिच्यावरच रागावत आणि म्हणत, 'तुझ्या आंगींच चतुरपणा, सौंदर्य नाहीं, त्याला धरून ठेवण्याजोगा युक्तिबाजपणा नाहीं, म्हणून हें असें होतें. त्याला कोणी काय करावें !'

वडिलांच्या प्रेमाचे हे जे परिणाम त्यापासून सतीशला पूर्णपणें वांचवावें या बुद्धीनें जगमोहनांनीं त्याला सर्वस्वी आपल्या देखरेखीखालीं घेतलें होतें. लहानपणापासून सतीशला इंग्रजी भाषेवर चांगलेंच प्रभुत्व प्राप्त झालें; लौकरच मिल आणि बेंथाम यांच्या डोकें भडकावणाऱ्या तत्त्वज्ञानाचा अग्नि त्याच्या डोक्यांत प्रज्वलित झाला आणि शेवटीं नास्तिकवादाची जणुं एक पेटती मशाल अशी सतीशची अवस्था झाली.

सतीश म्हणजे आपल्यापेक्षां लहान अशा बुद्धीनें त्याला जगमोहनबाबू कधीं वागवीत नसत. तर आपल्या बरोबरीचा एक मित्र म्हणूनच त्याच्याशीं ते वागत. आदराची जी भावना मनुष्याच्या वागण्यामध्यें आढळून येते ती केवळ अंधश्रद्धेमुळें निर्माण झालेली आहे, आणि मनुष्याला गुलाम करून टाकण्यासाठीं तिची हेतुपूर्वकच योजना करण्यांत आलेली आहे असें त्यांचें मत होतें. एकदां हरिमोहनांच्या एका जांवयानें त्यांना पत्र लिहिलें त्यांत शिरस्त्याप्रमाणें त्यानें असा मायना लिहिला होता--

" स्वामींचे पवित्र चरणांचे सेवेसी "---

त्यावर असें हें लिहिणें योग्य नाहीं हें दाखविण्यासाठीं जगमोहनांनीं त्याला पुढीलप्रमाणें उत्तर पाठविलें होतें---

" प्रिय नरेंद्र---पायांना 'पवित्र' असें विशेषण लावून त्यांच्या ठिकाणीं कोणता विशेष गुण आपण कल्पतों किंवा निर्माण करतों हें मला तर नाहींच पण तुलाही ठाऊक असेल असें मला वाटत नाहीं. तेव्हां हें विशेषण म्हणजे उगीच असून अडगळ अशा स्वरूपाचें आहे आणि म्हणून तें वापरण्याचें आपण सोडून दिलें पाहिजे. आणि एखाद्याच्या पायांनाच उद्देशून पत्र लिहावयाचें, ज्याचे ते पाय त्या बिचाऱ्याची कसलीच आठवण ठेवावयाची नाहीं हें पाहून माझ्यासारख्या पत्र वाचणाऱ्याच्या बुद्धीला खरेंच मोठा धक्का बसतो. म्हणून मला मुद्दाम तुला लिहावयाचें आहे कीं जोंपर्यंत माझे हे पाय माझ्या सर्व शरीराचा एक भाग म्हणून त्याला चिकटलेले

आहेत तोंपर्यंत तूं त्या पायांना शरीरापासून वेगळें कल्पिण्याची भानगड करूं नये. शिवाय तूं असा विचार करीत नाहींस कीं मनुष्याचे पाय झाले म्हणून कांहीं त्यांच्या ठिकाणीं कोणी काय जें लिहील तें समजण्याची शक्ति असते असें कांहीं नव्हे. तेव्हां त्यांचें जें स्वाभाविक कार्य ते विसरून त्याहून निराळेंच कांहीं काम त्यांच्यावर लादणें म्हणजे शुद्ध वेडेपणा नाहीं का ? आणखी असें पहा कीं, पाय शब्दाचें द्विवचन वापरण्याऐवजीं बहुवचन वापरलें आहेस तूं. हें बहुवचन तूं मुद्दाम आदरार्थी म्हणूनच वापरलें असावेंस; ( कारण कांहीं चतुष्पाद प्राणी असे आहेत कीं त्यांच्या बद्दल तुम्हां मंडळींना कांहीं विशेष आदर वाटत असतो. ) परंतु प्राणिकोटींत माझें स्थान कोणतें आहे याबद्दल कांहीं चुकीची कल्पना करून घेऊन जर तूं हें बहुवचन वापरलें असलेंस तर तुझी चुकी तुझ्या नजरेस आणणें, आणि मी द्विपाद माणूसच आहें हें तुला कळवून ठेवणें मला अत्यावश्यक वाटतें.

तुझा

—जगमोहन."

चार चौघांच्या संभाषणांमध्यें कांहीं कांहीं गोष्टींची चर्चा करूं नये असा शिष्टाचार आहे. पण अशाही विषयांची चर्चा जगमोहन बाबू सतीशबरोबर करीत असत. इतक्या लहान मुलाशीं तुम्ही हें काय सारें उघड उघड बोलतां असें कोणीं म्हटलें तर ते म्हणत, " गांधील माशांना घालवून द्यावयाचें असेल तर त्यांना आपल्या घरट्यांतून हुसकावून लावण्याला हवें हें तुम्हांला कबूल आहे ना; त्याचप्रमाणें कित्येक विषयांसंबंधीं बोलतांना आपल्याला जी लाज वाटते ती वाटूं नये, मोकळेपणीं तो विषय वादाला घ्यावा अशी इच्छा असेल तर लाज म्हणून जी एक वस्तु आपण लोकांनीं निर्माण केली आहे तिचाच नायनाट आपण करून टाकला पाहिजे."

सतीशचें कॉलेजचें शिक्षण संपलें तेव्हां त्याला त्याच्या काकापासून दूर करावें यासाठीं हरिमोहनबाबूंनीं नाना तऱ्हेचे शिकस्तीचे हरप्रयत्न केले. पण गळ्याला एकदां फांस पडल्यावर तो जसजसा ओढावा तसतसा तो जास्त जास्त घट्टच होत जाणार. त्यामुळें सतीश अधिकअधिकच हटवादी

आणि बाटगा–रूढीविरुद्ध वागूं लागला. आणि हरिमोहनांची आपल्या भावावरच्या रागाची कमान जास्त जास्त चढतच गेली. शिवाय आपला मुलगा आणि वडील बंधु यांचा हा नास्तिक बाटगेपणा जर केवळ मतापुरता आणि घरांतल्या घरांत असता तरी हरिमोहनांनीं त्याचें कांहीं एवढें वाटलें नसतें. कारण ताकाच्या पाण्याला दूध म्हणून वेळ मारून नेण्याची त्यांची केव्हांहि तयारी होती. एकादशीच्या दिवशीं कांद्याचें थालिपिठ खाऊनच्या खाऊन केळ्यांच्या पिठाचेंच थलिपीठ आपण खाल्लें अशी बतावणी करण्याला त्यांची कांहीं हरकत नव्हती. परंतु पुढें पुढें गोष्टी अशा थराला जाऊं लागल्या कीं या धार्मिक दुराचारी लोकांच्या दुराचरणावर खोटें बोलून पांघरूण घालावें म्हटलें तरी तें जमत नाहींसें झालें. शेवटीं प्रकरण एकदां अगदींच निकरावर येण्याला कारण घडलें तें असें :

जगमोहनांच्या नास्तिकवादाचा व्यवहारांतला परिणाम म्हणजे परोपकार करीत राहणें असा झाला होता. त्यासाठीं ते आपलें सर्वस्व सुद्धां गमवा-वयाला तयार असत. त्याबद्दल त्यांना विशेष प्रकारचा अभिमानही वाटे. ते म्हणत, " नास्तिकाच्या दृष्टीनें परोपकार ही फार मोठी वस्तु आहे; नास्तिक-वादी जो त्याग करतो तो सर्वथा निरपेक्ष असतो. आपण जी झीज सोसतों तिच्या मोबदल्याची आपल्याला अपेक्षाहि राहत नाहीं. इतरांप्रमाणें चालू किंवा पुढल्या जन्मासाठीं, पुण्याचा सांठा करण्याच्या काळजीनें किंवा पापाच्या दंडाच्या भयानें कांहीं ही झीज आपण सोशीत नसतों." पुष्कळांचें पुष्कळ हित साधण्यांत तुमचा हेतु काय असें त्यांना विचारलें तर ते म्हणत कीं, " असें करतांना आपण त्यापासून कांहीं मिळण्याची अपेक्षा बाळगीत नाहीं हेंच एक तसें करावेंसें वाटण्याचें फार मोठें कारण आहे." सतीशला तर ते नेहमीं म्हणत,

" बाबा आपण नास्तिक लोक आहों. आणि नास्तिकपणाबद्दल आपल्याला जो अभिमान आहे त्याच्याच बळावर आपण शुद्ध उभें राहिलें पाहिजे. कारण आपणापेक्षां उच्च असें आपण कांहींच मानीत नाहीं. तेव्हां आपण आपल्या स्वतःचाच मान नीटपणें राखला पाहिजे."

जगमोहनांच्या घरापासून जवळच मुसलमानांचीं कांहीं चामड्यांचीं दुकानें होतीं. या मुसलमानांचें आणि त्यांच्या चांभार मजुरांचें कांहीं हित करतां

आलें तर पाहावें असें उत्साहाच्या भरांत या चुलत्या-पुतण्यांनीं ठरविलें. आणि त्यासाठीं कंबर करून प्रत्यक्ष प्रयत्नांची सुरुवात पण केली. यामुळें तर हरिमोहनांच्या आंगाचा तिळपापड होऊन त्यांचा राग त्यांच्या पोटांत मावेनासा झाला. पण श्रुतिस्मृतीतले किंवा रूढीचे आधार दाखवून त्यांचा कांहीं या दोघां बाटग्या चुलत्या पुतण्यांच्या मनावर कांहींचासुद्धां परिणाम होणार नाहीं हें त्यांना ठाऊक होते. तेव्हां त्यांनीं आपल्या बंधूंजवळ 'तुम्ही आपल्या वडिलार्जित मिळकतीचा असा दुरुपयोग आणि अशी ही उधळपट्टी कां करतां' अशी अगदीं निराळ्याच प्रकारची तक्रार उपस्थित केली. त्यावर काकांनीं त्यांना उत्तर दिलें,

"खाऊन खाऊन तुस्त झालेल्या तुमच्या त्या भटाभिक्षुकांवर तूं जितकी उधळपट्टी करतोस तितका तर खर्च मला इकडे करायला कांहीं हरकत नाहीं. तेव्हांच आपआपल्या हिश्याची फिटंफाट होईल."

यानंतर एके दिवशीं जगमोहनांच्याकडे मोठ्या मेजवानीची तयारी चाललेली पाहून तर हरिमोहनांच्या कडच्या माणसांना आश्चर्याचा धक्काच बसला. आचारी, वाढपे वगैरे सर्व लोक पहावे तर आपले मुसलमान. तेव्हां हरिमोहनांनीं आपल्या मुलाला बोलावून घेतलें आणि त्याला ते रागानें म्हणाले, "तूं तुझे हे सन्मान्य मित्र-हे चांभारडे जमवून त्यांना मेजवानी देणार आहेस म्हणून ऐकतों!"

सतीश म्हणाला, "माझ्याजवळ कोठले एवढे पैसे असा विचार तरी मनांत यायला! मेजवानीचा बेत काकांनीं करून बोलावणीं केलेलीं आहेत."

सतीशचा मोठा भाऊ पुरंदर याच्या रागाचा पारा पण पुष्कळच चढला होता. या सगळ्या गलिच्छ लोकांना आपण जबरदस्तीनें हांकलून देऊं अशी धमकी द्यायला त्यानें सुरुवात केली. पुढें मग हरिमोहनांनीं प्रत्यक्ष जगमोहन काकांचीच गांठ घेतली आणि या सगळ्या प्रकाराबद्दल आपला विरोध प्रदर्शित केला. त्यावर जगमोहनकाका म्हणाले,

"तुम्ही आपल्या देवाच्या मूर्तींना नैवेद्य अर्पण करतां तेव्हां मी कधीं तुम्हांला कांहीं म्हणतों कां? मग माझ्या देवाना मी नैवद्य अर्पण करीत असतांना तुम्ही उगीच हरकत का घ्यावी?"

"तुमचे देव?" हरिमोहनांनीं आश्चर्यचकित होऊन म्हटलें.

" होय, माझे देव. " त्यांच्या बंधूंनीं त्यांना उत्तर दिलें.

" म्हणजे अकस्मात तुमच्यांत कांहीं फरक होऊन तुम्ही आस्तिक बनलां कीं काय ? " त्यांची टर उडविण्याच्या उद्देशानें हरिमोहनांनीं प्रश्न केला.

" छे, छे ! " त्यांच्या बंधूंनीं उत्तर दिलें. कारण आस्तिक लोक हे अदृश्य अशा देवाची पूजाअर्चा करीत असतात. तुम्ही मूर्तिपूजक लोक तर त्यांच्याही पुढें जाऊन दिसणाऱ्या परन्तु मुक्या आणि आंधळया दगडा-मातीच्या देवांची पूजाअर्चा करतां. पण मी ज्यांच्यावर भक्ति करतों ते माझे देव दृश्य आणि चांगले चालते बोलते आहेत. त्यांच्या अस्तित्वा-बद्दल मनांत शंका येणेंच संभवनीय नाहीं. "

" म्हणजे हे चांभार आणि मुसलमान हे तुमचे देव असंच का खरोखरी तुम्हांला म्हणायचं आहे ? " हरिमोहनांनीं निराशेच्या स्वरांत विचारलें.

" अर्थातच, " जगमोहन म्हणाले, " मी त्यांच्यापुढें नैवेद्य ठेवल्या-नंतर त्यांच्या ठिकाणची अलौकिक शक्ति तुमच्या निदर्शनास येईल. कारण हे माझे देव त्या नैवेद्याचें प्रत्यक्ष भक्षण करतील. तुमच्या एका तरी देवाच्या हातून अशी गोष्ट होईल ? असेल तशी छाती कोणाची तर आणा त्याला माझ्यापुढें ! माझ्या देवांचीं हीं दैवी चमत्काराचीं कामें पाहिलीं म्हणजे माझ्या मनाला कसा संतोष होतो. आणि तुमची सदसद्विवेकबुद्धि जर नष्ट झालेली नसती तर तुम्हांलाही या संतोषाचा आनंद—अनुभवतां आला असता. "

यानंतर मग पुरंदराची स्वारी काकांकडे आली; आणि मोठमोठ्यानें आरडून ओरडून त्यानें आपल्या काकांना धमक्या देण्याचा प्रयत्न केला, कीं तशीच वेळ आली तर वाटेल तें करून आपण हा सगळा प्रकार उध-ळून टाकूं. तें ऐकून जगमोहनांना हंसूंच कोसळलें; ते म्हणाले,

" अरे जा रे माकडा ! माझ्या देवांच्या अंगावर हात टाकण्याचा प्रयत्न तर तूं करून पहा, मग समजेल तुला त्यांची शक्ति किती आहे ती. त्यांचे तेच तुझा समाचार पाहून घेतील. त्यांच्या मदतीला जाण्याचें मला मुळींच कारण पडणार नाहीं. "

पुरंदर तर आपल्या वडिलांपेक्षांहि मोठा भेदरट होता, आपलें कोणी ऐकेल, आपल्यामुळें कोणी दबेल अशी खात्री असे तेव्हांच त्याचा जुलमी अवतार प्रकट होत असे. तेव्हां या प्रसंगीं आपल्या मुसलमान शेजाऱ्यांशीं भांडण काढण्याची त्याची छाती नव्हती. त्याऐवजीं सतीशकडे जाऊन त्यानें त्याला पुष्कळशा शिव्या देऊन घेतल्या. सतीश आपल्या त्या विस्मयजनक डोळ्यांनीं त्याच्याकडे नुसता टवकारून पाहात मात्र राहिला. एका शब्दानें सुद्धां त्यानें आपल्या भावाला कांहीं उत्तर दिलें नाहीं.

आणि मेजवानी तर मोठ्याच थाटांत पार पडली.

## ३

हा जो आपला एवढा अपमान झाला तो काय असा तसा गिळून हरिमोहनबाबू हात जोडून स्वस्थ बसणार होते ? त्यांनीं जगमोहनाविरुद्ध उघड उघड युद्धच पुकारलें. ज्या मिळकतींतून त्यांच्या एकंदर कुटुंबाचा निर्वाह चालत असे ती मिळकत होती देवस्थानची मिळकत. म्हणून हरिमोहनांनीं आपल्या बंधूंविरुद्ध दिवाणी कोर्टांत दावा मांडला. " जुन्या सनातन धर्माचाराविरुद्ध आपल्या बंधूंकडून इतके कांहीं अनाचार घडले आहेत कीं, देवस्थानच्या मिळकतींची व्यवस्था पाहण्याची पात्रता त्यांचे ठिकाणीं राहिलेली नाहीं. " अशी त्यांची मुख्य तक्रार होती. ही गोष्ट सिद्ध करण्यासाठीं त्यांना म्हणतील तेवढे साक्षीदार उभे करतां आले. आसपासचा सर्व हिंदु समाज त्यांच्या पाठिंब्याला उभा होता.

परंतु जगमोहनबाबूंनीं तर भरकोर्टांत कबुलीच दिली कीं, " परमेश्वरावर अथवा मूर्तिपूजेवर आपली मुळींच कोणत्याच प्रकारची श्रद्धा नाहीं; जगांत खाण्यापिण्यांत निषिद्ध किंवा त्याज्य असें आपण कांहींही मानीत नाहीं; मुसलमान हे ब्रह्मदेवाच्या कोणत्या अवयवापासून उत्पन्न झालेले आहेत हें शोधून काढण्यासाठीं आपण आपल्या जिवाची कधीं वृथा यातायात केलेली नाहीं, आणि म्हणून त्यांना पंक्तीला घेऊन जेवणखाण्याला आपल्याला यत्किंचित् सुद्धां आडकाठी वाटत नाहीं. "

' या देवस्थानच्या मिळकतीपासून कसल्याहि प्रकारचा लाभ घेण्याला जगमोहनबाबू पात्र नाहींत असा जज्जसाहेबांनीं निवाडा दिला. वरच्या अपील

कोर्टात हा निकाल फिरवून घेतां येईल असा जगमोहनबाबूंच्या वकिलांनीं त्यांना सल्ला दिला. परंतु जगमोहनांनीं अपील करण्याचें नाकारलें. या देवांच्यावर माझा जेथें विश्वासच नाहीं, तेथें त्यांची फसवणूक करण्याची भानगड पण मी करणार नाहीं; या अशा देवदेवतांवर विश्वास ठेवण्याला ज्यांच्या बुद्धीला अडचण पडत नाहीं त्यांच्याच सारासार विचारशक्तीला या देवांची फसवणूक करून लुबाडण्यांत कांहीं पाप वाटणार नाहीं; असें त्यांचें म्हणणें पडलें.

"पण मग तुम्हीं उदरनिर्वाहाची सोय काय करणार ?" त्यांच्या स्नेह्यासोबत्यांनीं त्यांच्यापुढें प्रश्न टाकला.

त्यावर ते म्हणाले, "अगदींच कांहीं खायला प्यायला उरलें नाहीं अशी माझी अवस्था होणार असली तर मग अखेरचा श्वास आंत घ्यावयालाही माझी कांहीं हरकत नाहीं."

दाव्याचा हा असा निकाल झाल्यानंतर राहत्या घराची वाटणी होऊन त्याचे दोन भाग करण्यांत आले. अगदीं खालच्या मजल्यापासून तों थेट सर्वांत वरच्या मजल्यावर आढ्यापर्यंत एक भिंत उभारण्यांत आली त्या दोन्ही भागांमध्यें.

स्वार्थाला धक्का बसूं लागला कीं मनुष्याचें डोकें चांगलें ताळ्यावर येतें, खिशाला चट्टा बसूं लागतांच मनुष्य सावध होऊन सरळ मार्गावर येतो, पोटाच्या आगीपुढें तत्त्वाचे ताबूत सगळे थंडे पडतात, असा हरिमोहन बाबूंचा मोठा विश्वास होता. आज जरी सतीश जगमोहनबाबूंच्या घरट्यांत सुख मानीत असला तरी आपल्या इकडच्या बाजूच्या चैनीचा आणि चंगळीचा वास लागला म्हणजे सतीश आपल्या सोनेरी पिंजऱ्यांत सांपडल्यावांचून खास रहात नाहीं असें त्यांना खात्रीनें वाटत होतें. परंतु आपल्या ठिकाणीं आपल्या वडिलांच्या आंगची सारासार विचार शक्ति तर नाहीं, परंतु त्यांच्यामधील शहाणपणाचा, दूरदर्शीपणाचाही अंशसुद्धां आपल्या आंगीं उतरलेला नाहीं. याचें पुन्हां एकदां प्रत्यंतर सतीशनें दाखवून दिलें. तो आपल्या काकांजवळच राहिला.

सतीश हा सर्वतोपरी आपलाच आहे अशा रीतीनें त्याच्याकडे पाहण्याची जगमोहनबाबूंना इतकी कांहीं संवय होऊन गेली होती कीं वाटणी

झाल्यानंतर सतीश आपल्या बाजूचा राहिला यांत म्हणजे विशेष कांहीं झालें असें त्यांच्या मनांतसुद्धां आलें नाहीं.

परंतु हरिमोहनबाबू आपल्या भावाचा स्वभाव चांगला ओळखीत होते. म्हणून आतां त्यांनीं लोकांमध्यें जाऊन जगमोहनबाबू सतीशला कां सोडीत नाहींत याबद्दल लोकांचे कान भरावयाला सुरुवात केली. ते लोकांना सांगत कीं, " अहो आयता सांपडला आहे तो हातामध्यें; त्याला कसा ते सोडतील; त्यास ओलीस म्हणून ठेवायचा आणि त्याच्या मोबदल्यांत माझ्याकडून कांहीं उकळतां आलें तर पाह्यचें हा तर यांत सगळा कावा आहे. " केव्हां केव्हां तर डोळ्यांतून अगदीं पाणी काढल्यासारखें करून ते म्हणत, " अहो, पण एवढा हा सैतानी कट त्यांनीं जो माझ्याविरुद्ध चालविला आहे तो कशासाठीं म्हणून ? कसे झाले तरी ते माझे भाऊच नव्हेत का ? खाण्यापिण्यावांचून त्यांना मी उपाशी मरूं देईन अशी आमच्या दादांच्या मनाला कल्पना तरी कशी शिवते ! तेव्हां आतां मी पण अगदीं ठरवून टाकलें आहे कीं, आपण होऊन म्हणून कांहीं करायचें नाहीं. स्वस्थ बसून काय होईल तें नुसतें पाह्यचें. बघूं याच तरी कोणाची चतुराई कोणावर कडी करते ती ! "

हरिमोहनबाबूंनीं जो हा असा खोटा आणि विषारी प्रचार जगमोहनांविरुद्ध चालू केला होता त्याची टिमकी वाजवून जाहिरात करायला हरिमोहनांचें दोस्तमंडळ होतेंच. तेव्हां असा हा प्रकार चाललेला आहे हें हळुहळू जगमोहनांच्या कानावर आलेंच. आणि आपले बंधुराज हा असा कांहींतरी डाव टाकणार हें आपल्या लक्षांत कसें आलें नाहीं, इतकें कसें आपलें डोकें मद्द, याचा त्यांना अचंबाच वाटला.

आणि ते सतीशला म्हणाले, " सतीश, तुझा आमचा रामराम बाबा यापुढें. "

एकदां एखादी गोष्ट जगमोहनबाबूंनीं विचारपूर्वक ठरविली म्हणजे मग त्यांत ते कधीं बदल करायचे नाहींत हें सतीशला पक्कें ठाऊक होतें. तेव्हां आज अठरा वर्षें ज्या चुलत्यांच्या सहवासांत त्यानें घालविलीं त्यांना सोडून जाण्यावांचून त्याला दुसरा मार्गच नव्हता.

आपलें अंथरूण पांघरूण आणि पुस्तकें बिस्तकें सतीशनें टांग्यांत टाकलीं

आणि जगमोहनांचा निरोप घेऊन तो चालूं लागला. त्यासरशीं जगमोहनांनीं खोलीचें दार लावून घेतलें; आणि धाडकन् जमिनीवर आंग टाकलें. संध्याकाळ झाली, दिवस मावळून अंधार पडायची वेळ झाली. तेव्हां त्यांचा म्हातारा गडी दिवा लावून घेऊन आला आणिं त्यानें दार खडखडावलें. पण त्यालाही आंतून जगमोहनांनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं.

अरेरे, पुष्कळांचें पुष्कळ सुख या तत्त्वाची कोण ही दुर्दशा! मानवी सुखदुःखाच्या व्यवहाराचें मोजमाप मनुष्यांच्या संख्येच्या कमीअधिकपणावरच केवळ राहील ही गोष्ट शक्यच नाहीं. अहो, एखाद्या मनुष्याला " तें एकच कोणी " माणूस मिळालें आणि डोकें सोडून केवळ अंतःकरणाच्याच मदतीनें तो उदाहरण सोडवायला बसला म्हणजे त्याच्या त्या " एकाची " गणति शून्यलब्धीच्यासुद्धां पलीकडे जाऊं लागते. अशाच प्रकारें सतीश गेल्यावर जगमोहनांचेंही झालें. विश्वांतील अगणित आणि अमर्याद अशा मनुष्यमात्राहून त्यांना तो मोठा भासूं लागला. तो एकटा गेल्याबरोबर सारें अफाट जग ओसाड पडल्यासारखें त्यांना झालें.

सतीश तेथून निघाला तो एका विद्यार्थिवसतिगृहांत आपल्या एका मित्राच्या खोलींत जाऊन राहिला. या कलियुगांत तरुण मंडळींच्या मनांतून मातृपितृप्रेमाची सुद्धां कशी हेळसांड होऊं लागली आहे, या कर्तव्याची सुद्धां त्यांना ओळख कशी राहत नाहींशी झाली आहे हें पाहून हरिमोहनांच्या डोळ्याला पाणी आलें. नाहीं तरी हरिमोहनांचें अंतःकरण होतेंच तसें फार हळवें.

वाटण्या झाल्यानंतर पुरंदरानें आपल्या भागांतील एका खोलीचेंच देऊळ बनविलें. आणि तेथें आपल्या देवदेवतांचें ठाण मांडलें. त्या ठिकाणीं सकाळ संध्याकाळ शंख आणि घंटा यांचा भला मोठा आवाज दुमदुमत असे; त्यामुळें आपले काका मनांतून कसे चडफडत असतील या विचारानें त्याला कांहीं चमत्कारिक आनंद होत असे.

पोटापाण्याची कांहीं तरी व्यवस्था हवी म्हणून सतीशनें एक शिकवणी मिळविली. इकडे जगमोहनांनाही एका शाळेमध्यें मुख्य अध्यापकाची जागा मिळाली. पण त्यामुळें नास्तिक अशा जगमोहनांच्या दुष्ट शिकवणीचा परिणाम मुलांच्या कोवळ्या मनावर होणार, तेव्हां या संकटापासून त्या

मुलांना वाचविण्यासाठीं लोकांनीं त्या शाळेंतून आपलीं मुलें काढावींत अशी खटपट करणें हें पुरंदर आणि हरिमोहन यांचें तर धार्मिक कर्तव्यच होऊन बसलें.

४

बरेच दिवस होऊन गेल्यानंतर आज सतीश जगमोहनबाबूंच्याकडे आला होता. लहानांनीं खालीं वांकून मोठ्या माणसांच्या पायांची धूळ आपल्या कपाळाला लावायची नि मोठ्यांनीं त्यांच्या पाठीवरून हात फिरवून त्यांना आशीर्वाद द्यावयाचा, वगैरे नमस्कार चमत्काराचें तंत्र त्या दोघांनीं कधींच सोडून दिलेलें होतें. सतीश येतांच जगमोहनबाबूंनीं त्याला प्रेमानें पोटाशीं धरलें, खुर्चीवर नेऊन बसविलें आणि कशी काय हालहवाल आहे म्हणून प्रश्न केला.

हालहवाल, खबर तर फारच मोठी होती !

ननीबाला नांवाची एक बालिका आपल्या विधवा आईच्या आसऱ्याला राहत होती. तिची आई आपल्या भावाच्या घरीं राहत असे. ननीबालाची आई होती तोंपर्यंत तिचें सर्व कांहीं ठीक ठीक चाललें होतें. पण नुकतीच तिची आई वारली होती. तिचे मामेभाऊ होते ते मोठे बदमाष लोक होते. त्यांच्यापैकीं एकानें या मुलीला फूस लावून पळवून नेलें. पण पुढें या राजश्रींना ननीबालेच्या एकनिष्ठपणाविषयीं शंका आली; व तिचा तो सारखा छळ करूं लागला. सतीश ज्या घरीं शिकवणीला जात असे त्याच्या पलीकडच्याच घरांतली ही सारी हकिकत. या मुलीला तिच्या त्या सगळ्या हालांतून सोडवावें असें सतीशच्या मनांत फार. पण त्याच्याजवळ ना पैसा, कीं ना कोठें पाय ठेवायला आसऱ्याचें स्थान. म्हणून आपण तुमच्याकडे आलों आहों अशी हकिकत सतीशनें सांतितली. आणि आतां तर तिचे दिवस भरून ती अगदीं बाळंत व्हायला आली होती.

ही सगळी हकिकत ऐकून जगमोहनबाबू संतापानें नुसते लाल झाले. आपण जें काय करूं त्याचा परिणाम काय होईल याचा नीट निर्विकारपणानें रोखठोक हिशोब आपल्या मनाशीं आधीं पाहावा असा त्यांचा स्वभावच नव्हता. तावडतोब ते आपल्या पुतण्याला म्हणाले, “ माझी पुस्तकांची खोली रिकामीच आहे. तेथें त्या मुलीला मी ठेवून घेऊं शकेन.”

" पण तुमच्या पुस्तकांचें तुम्ही काय करणार ! तीं कुठें ठेवणार ! " सतीशनें आश्चर्यानेंच विचारलें.

त्याला कोठें ठाऊक होतें कीं आतां घरांत फारच थोडीं पुस्तकें शिल्लक राहिलेलीं होतीं. जोंपर्यंत नोकरी मिळाली नव्हती तोंपर्यंतच्या दरम्यानच्या काळांत जगमोहनांना आपलीं पुस्तकें विकूनच स्वतःचा निर्वाह करावा लागला होता. पण हें कांहींच न बोलतां जगमोहनबाबू त्याला म्हणाले,

" तर मग त्या मुलीला आतांच्या आतां इकडे घेऊन ये. "

" खालींच ती उभी आहे; येतांना मी बरोबरच घेऊन आलों होतों तिला. " सतीश म्हणाला. जगमोहन जिन्यांतून धांवतच खालीं गेले, तों, एका कोपऱ्यांत आंग चोरून बसलेली ती मुलगी त्यांच्या दृष्टीला पडली. आपली साडी तिनें आंगाभोंवतीं इतकी गुंडाळून घेतलेली होती कीं समोर एखादें कपड्याचें लहानसें गाठोडेंच आहे असें पाहाणाराला वाटावें.

आपल्या खोल घोगऱ्या आवाजांत जगमोहन बाबूंनीं तावडतोब तिचें स्वागत करून तिला धीर दिला. ते म्हणाले, " चल माझे बाई, इथें अशी धुळींत कां बसली आहेस ! "

त्या मुलीनें आपलें तोंड दोन्ही हातांत झांकून घेतलें. आणि तिच्या डोळ्यांतून पाण्याची नुसती धार सुरू झाली. जगमोहनबाबू कांहीं भावनेच्या आहारीं जाणारे मनुष्य नव्हते. परन्तु सतीशकडे वळून जेव्हां ते म्हणाले, " ही मुलगी आज जो भार वाहते आहे त्याची जबाबदारी खरोखर आपली आहे; आपलें ओझें ती वाहते आहे, " तेव्हां त्यांचेही डोळे ओले झाल्या-वांचून राहिले नाहींत.

मग ते त्या मुलीकडे वळून पुन्हां म्हणाले, " बाई ग, मला लाजायचें तुला मुळींच कारण नाहीं. माझे शाळासोबती पहिल्यापासून मला ' वेडा जगाई ' म्हणत असत. आणि आजच्या वयाला मी त्याच्या तसाच एक वेडा माणूस राहिलेलों आहें. "

एवढें बोलून मनाचा एवढा सुद्धां संकोच न करतां अगदीं मोकळे-पणानें त्यांनीं त्या मुलीला दोन्ही हातांनीं धरून उभी केली. या गडबडींत तिच्या तोंडावरचा पदर दूर झाला. तिच्या त्या तरुण वयांतही अजून तिच्या चेहऱ्यावर निरागस बाल्यभाव आणि टवटवीतपणा कायम होता.

पापाचरणानें निर्ढावल्याचा जुनाटपणा, किंवा कठोरपणा तिच्या चेहऱ्यावर थवढा सुद्धां दिसत नव्हता. सुंदर फुलावर एखादा धुळीचा कण पडला म्हणून त्याचें आंगचें सौंदर्य जसें नष्ट होत नाहीं, त्याचप्रमाणें तिच्या अंतरंगांतील सहज पावित्र्य कांहीं नष्ट झालेलें नव्हतें.

हात धरून जगमोहनांनीं ननीबालाला वरती आपल्या पुस्तकांच्या खोलींत नेलें. आणि तेथें ते तिला म्हणाले," पहा बाई, ही आमच्या खोलीची दशा. नीट कोणी ती झाडली सवरलेली सुद्धां नाहीं. इथल्या जिनसा तरी बघ कशा जिकडे तिकडे अगदीं हव्या तशा पडलेल्या आहेत. माझें म्हणशील तर सगळें या अवतारला साजेसेंच प्रकरण आहे. कधीं नेमल्या वेळीं आंघोळ आणि जेवण होईल असें कांहीं घडायचें नाहीं. पण आतां तूं इथें आमच्या घरीं आली आहेस तेव्हां आतां सगळें कांहीं ठाकठीक करून टाकूं पहा. एवढेंच काय, हा जगाई असा वेडा आहे ना, पण तो सुद्धां एखाद्या प्रतिष्ठित शाहण्या माणसासारखा वागायला लागलेला तुला दिसेल."

ननीबाला खरें म्हटलें म्हणजे आपल्या आईजवळ रहात आलेली होती, तरी पण कोणा एखाद्या माणसावर मनुष्याचा किती जीव बसूं शकेल याची कांहीं तिला जाणीव नव्हती. कारण ही म्हणजे आपली पोटची पोर अशा भावनेनें तिची आई तिच्याशीं कधीं वागतच नसे; तर जिच्यावर सतत नजर ठेवायला हवी अशी एक तरुण मुलगी अशीच तिच्याविषयीं तिच्या आईची वृत्ति असे.

ननीबालेच्या हाताखालीं कामधामाला जगमोहनबाबूंनीं एक म्हातारी बाई ठेवली. आपण पापी, अपवित्र, तेव्हां आपल्या हातचें अन्न जगमोहनबाबू खातील कीं नाहीं अशी प्रथम ननीबालेला शंका वाटत होती. परंतु ननीबालेनें स्वत: स्वयंपाक करून स्वत:च वाढल्याखेरीज आपण जेवणारच नाहीं असा उलट जगमोहनांनीं आग्रह धरल्यानें तिच्या प्रत्ययाला आलें.

आतां आपल्याविरुद्ध मोठीमोठी निंदेची लाट उसळणार हें जगमोहन जाणून होते. जगमोहनबाबूंच्या डोक्यावर असा हा आघात आल्याशिवाय राहणें असंभवच आहे हें ननीबालेलाहि दिसत होतें. आणि त्यामुळें तिचें मन फार अस्वस्थ असे. कल्पनेप्रमाणें एकदोन दिवसातच ही लाट उसळायला सुरुवात पण झाली.

त्यांनीं चाकरीला जी म्हातारी बाई ठेवली तिची आपली पहिल्यापासून समजूत काय कीं ननीबाला ही जगमोहनांची मुलगी. पण एक दिवस ती जी बाहेरून आली ती कडकडतच आली. ननीबालेला खूप अद्वातद्वा तिनें बोलून घेतलें आणि पुरे झाली असली चाकरी असें तिरस्कारानें म्हणून ती निघून गेली काम सोडून. आतां जगमोहनबाबूंना काय वाटेल, ते काय म्हण· तील या भीतीनें ननीबाला नुसती पांढरी फटफटीत पडली.

पण जगमोहन तिला म्हणाले, "बये, माझ्या जीवनाच्या—संसाराच्या क्षितिजावर पूर्ण चंद्राचा उदय झालेला आहे. तेव्हां निंदेच्या समुद्राला उधान येण्याची ही वेळच आहे. पण भरतीमुळें पाणी किती जरी गढूळ झालें तरी माझा चंद्रप्रकाश कांहीं त्यामुळें एवढा सुद्धां मलिन होणार नाहीं."

जगमोहनांची एक मावशी का चुलती, कोणीशी हरिमोहनांच्या तिकडून येऊन कुजबुजायला लागली, "अरे जगाई, काय मांडलें आहेस तूं हें? भ्रष्टाकार, सारा भ्रष्टाकार! साऱ्या घराची ही केवढी नापत! हें पाप, ही नापत साफ धुवून टाक बाबा! अगदीं मागमूस सुद्धां राहूं देऊं नकोस."

जगमोहनांनीं उत्तर केलें, "तुम्ही पडलां पवित्र पुण्यवान मंडळी; तेव्हां तुमच्या ठिकाणची ही भावना तुम्हांला शोभणारीच आहे. पण पापाचा अगदीं मागमूस ठेवायचा नाहीं असें करायचें म्हटलें तर पाप ज्याच्या हातून घडलें त्या माणसाचें काय? तिची काय व्यवस्था?"

त्यानंतर कोठलीशी एक म्हातारी आजी येऊन त्यांना उपदेश करायला लागली कीं, "अरे, या कारटीला इस्पितळांत दे ना पोंचवून. हरिमोहन या संबंधांतला सगळा खर्च करायला तयार आहे."

त्यावर जगमोहन म्हणाले, "पण ती तर माझी आई आहे. कोणी एखादा मनुष्य खर्च करायला तयार आहे म्हणून काय मी आपल्या आईला इस्पितळांत पाठवूं?"

आश्चर्यानें ती आजीबाई डोळे फाडूनच जगमोहनांच्याकडे पाहूं लागली. आणि एकदम वसकन् ओरडली, "म्हणजे! कुणाला आई म्हणतो आहेस तूं?"

जगमोहनांनीं उत्तर दिलें, "जिनें आपल्या पोटांत एक जीव संभाळला

आहे, आणि जी अपत्याला जीव–जन्म देण्यासाठीं आपला स्वतःचा जीव धोक्यांत घालायला तयार आहे तिला. या मुलाच्या जन्माचें आणखी एक मूळ कारण असलेल्या त्या बदमाप माणसाला मात्र कांहीं मी या मुलाचा बाप म्हणणार नाहीं. कारण स्वतःच दुसऱ्यावर संकट आणावें, आणि आपण मात्र त्यांतून नामानिराळें राहावें एवढेंच त्याला करायचें आहे."

या सगळ्या निर्लज्जपणामुळें हरिमोहनांच्या आंगाचा नुसता तिळपापड होऊन गेला. जें हें आपलें पवित्र सती अशा मातांच्या आणि आजींच्या सान्निध्यानें पिढ्यान्‌पिढ्यापासून पुनीत होत आलेलें आहे, त्याच घरांत आणि कुटुंबांत केवळ एका भिंतीच्या आड राजरोस एका भ्रष्ट पापी स्त्रीला आसरा मिळावा ! काय हा भ्रष्टाकार; कोण हो बेअब्रू ! कोठें तोंड दाखवायची सोय उरली नाहीं. कसें सहन करावें हें माणसानें ! असें त्यांना होऊन गेलें.

हरिमोहनांनीं सरळ असा तर्क केला कीं, आपला सतीशच खुद्द या भानगडींत सांपडलेला असला पाहिजे. आणि त्याच्या या निर्लज्ज वर्तनाला त्याच्या काकांकडून पाठिंबा-फूस मिळत असली पाहिजे. आपला हा तर्क अगदीं बिनचूक असला पाहिजे याबद्दल त्यांची इतकी वालंबाल खात्री होती कीं, ही गोष्ट त्यांनीं जिकडे तिकडे पसरवून दिली. पण त्यांचें म्हणणें चुकीचें आहे असें सांगण्यासाठींसुद्धां जगमोहनांनीं एक चकार शब्द तोंडांतून काढला नाहीं. कारण ते म्हणत. "आम्हां नास्तिक लोकांना आपल्या सदाचरणाबद्दल प्राप्ति व्हायची ती या निंदास्वरूपी स्वर्गाचीच."

जगमोहनांच्या वर्तनाबद्दल खोट्यानाट्या कंड्या जास्त जास्त उठून विपर्यास जों जों वाढूं लागला तों तों त्यांच्या आनंदाला जणुं भरतें येऊं लागलें. आणि त्यांच्या प्रचंड हास्यामुळें आभाळ जणुं फाटण्याची वेळ आली. असल्या या बाबतींत सतीशचे काकासाहेब स्वतःच उघड उघड थट्टामस्करी करतील आणि मोठमोठ्यानें आपल्या पुतण्याशीं त्याबद्दल विदुषकी थाटाची असभ्य, ग्राम्य बडबड करतील असें हरिमोहनांच्या काय किंवा त्यांच्या बरोबरीच्या इतर संभावित गृहस्थांच्या काय कधीं स्वप्नांतसुद्धां आलें नसेल.

काका ज्या भागांत रहात असत त्या भागांत जायचें पुरंदर आतांपर्यंत

अगदीं काळजीपूर्वक टाळीत असे. परंतु या पोरीला या ठिकाणाहून घाल-वून दिल्याशिवाय आराम राहणार नाहीं अशी त्यानें आतां प्रतिज्ञाच केली.

जगमोहनांना शाळेंत जाणें तर भागच होतें. म्हणून शाळेंत जातेवेळीं आपल्या घराचीं सर्व प्रवेशद्वारें ते चांगलीं बंद करून टाकीत असत आणि शाळेंत थोडी जरी फुरसद मिळाली तरी तेवढ्यांत ते घरीं येऊन ननीबालेची विचारपूस करून जात असत.

एके दिवशीं भर दुपारीं पुरंदरानें एक बांबूची शिडी घेतली आणि तिच्यावरून तो गच्चीवरच्या घराच्या दोन्ही भागांच्या हद्दीवरच्या भिंती-वरून चढून उडी मारून जगमोहनांच्या बाजूकडे गेला. ननिबाला दुपारच्या जेवणानंतर विश्रांतीसाठीं जरा लवंडली होती. तिच्या खोलीचें दार उघडेंच होतें. गच्चीवरून खालीं येतां येतां तिचें शरीर निजलेल्या स्थितींतच पुरं-दराच्या नजरेला पडलें आणि एकदम दचकून तो मोठ्यानें ओरडला, "असं! म्हणजे तुम्ही आहात काय बाईसाहेब इथें! अरेच्चा!"

त्या आवाजानें ननी जागी होऊन पाहते तों तिच्यासमोर पुरंदर उभा. एकाएकीं तिचा चेहरा प्रेतासारखा पांढरा फटफटीत झाला; तिच्या हाता-पायांत एवढा सुद्धां जीव शिल्लक राहिला नाहीं. पळून जावें तर पाय उच-लायलाही तिच्या आंगांत बळ राहिलें नव्हतें, आणि कांहीं बोलावें तर तोंडांतून शब्दही उमटत नव्हता.

पुरंदर तर रागानें नुसता थरथर कांपत होता. त्यानें पुन्हां मोठ्यानें ओरडून हांक मारली, "ननी!"

एवढ्यांत पाठीमागून जगमोहनबाबू आंत खोलींत आले. आणि अधि-कारवाणीनें त्यांनीं त्याला 'येथून चालता हो' अशी आज्ञा केली.

मांजराला राग आला म्हणजे शेपटीसुद्धां त्याचें शरीर जसें फुगतें तसें पुरंदराचें शरीर रागानें फुगून जणूं फुटण्याच्या बेतांत आलें. परंतु जग-मोहनबाबूंनीं त्याला घालवून देण्याचा निश्चयच केला होता. "या क्षणीं जर तूं येथून चालता झाला नाहींस तर आतां मी पोलिसला हांक मारीन," अशी त्यांनीं पुरंदराला धमकी घातली.

जातां जातां पुरंदरानें ननीबालेकडे बाणासारखा तीव्र कटाक्ष फेंकला ननीबाला तत्क्षणीं मूर्छित होऊन पडली.

आतां जगमोहनांच्या लक्षांत सारा प्रकार आला. विचारपूस केल्यावर त्यांना आढळून आलें कीं ननीबालेला पुरंदरानेंच भ्रष्ट केलेली आहे ही गोष्ट सतीशला आधींपासूनच ठाऊक होती. परंतु उगीच तंट्याचा भडका उडायला नको म्हणून त्यानें ती गोष्ट हरिमोहनांच्या कानांवर पोंचूं दिली नव्हती.

ह्या प्रकार घडल्यानंतर कळकाचें पान जसें वाऱ्याच्या झुळुकेनें सुद्धा थरारतें तशी ननीबालेची भीतीमुळे अवस्था होऊन गेली होती. पुढें मग ती शांत झाली. पण मूल जन्मतःच मेलेलें निपजलें.

यासंबंधी मूळची गोष्ट अशी होती कीं एके दिवशीं ऐन मध्यरात्रीच्या सुमारास पुरंदरानें ननीला शयनगृहांतून लाथ मारून बाहेर घालवून दिलें होतें. पुढें मग त्यानें तिचा पुष्कळ तपास केला. तरी पण कांहीं तलास त्याला लागला नव्हता तिचा. अशा स्थितींत आपल्या चुलत्याच्या घरींच जेव्हां एकाएकीं ती त्याच्या दृष्टीस पडली तेव्हां त्याच्या मनांत मत्सराची भयंकर अनावर लाट उसळली. त्याला पुरेपुर खात्री वाटली कीं हें सारें सतीशचेंच काम. त्यानेंच तिला आपल्यापासून फुसलावून नेली आणि आपल्या चैनीसाठीं ठेवून दिली. ती तरी कुठें तर मुद्दाम अगदीं आपल्या काकांच्याच येथें. यांत त्याचा केवळ एकच हेतु असणार. तो म्हणजे आपल्या वडील भावाचा मुद्दाम अपमान करावयाचा. हें सारें कोणीही माणूस झाला तरी कसें सहन करणार ?

हरिमोहनांच्या कानांवर अर्थातच ही हकीकत गेली. बाकी आपले हे असले चाळे वडिलांपासून लपविण्याचा पुरंदर एवढा सुद्धां प्रयत्न करीत नसे. कारण आपल्या मुलाच्या वागणुकींतील नैतिक ढिलाईकडे हरिमोहन जरासा कानाडोळाच करीत असत; थोडसें प्रेमानें अशा बाबतींत ते त्याचे लाडच पुरविल्यासारखें करीत म्हणा ना ! पण सतीशच्या बाबतींत हे असे लाड चालूं देण्याची त्यांची तयारी नव्हती. तेव्हां सतीशनें प्रत्यक्ष आपल्या भावापासून अशा रीतीनें जिच्यावर पुरंदराचें मन बसलेलें होतें अशा त्या पोरीला पळवून न्यावी ही गोष्ट सदाचरणाच्या दृष्टीनें त्यांना सर्वतोपरी गर्ह्य वाटली. तेव्हां आपली हातची गेलेली शिकार पुरंदराला परत मिळविण्याच्या बाबतींत यश यावें अशी जणुं भक्तियुक्त अंतःकरणानें देवापाशीं ते आशा व्यक्त करीत होते.

ननीबाला बाळंतीण झाली ते दिवस नाताळच्या सुटीचे होते म्हणून जगमोहनबाबू रात्रंदिवस तिच्या जवळ शुश्रूषेसाठीं राहूं शकत. एक दिवस तिला करमणुकीसाठीं वाल्टर स्कॉटच्या कादंबरीचें भाषांतर करून ते सांगत होते. इतक्यांत पुरंदर, बरोबर एक आपल्यासारखाच तरुण मनुष्य घेऊन धाडकन दार उघडून त्यांच्या खोलीमध्यें आला.

पोलीसला बोलावून तुम्हांला घराबाहेर हाकलून लावतों असा त्यांनीं त्या दोघांना धाक घातला तेव्हां तो नवखा तरुण म्हणतो, " मी ननीचा चुलतभाऊ आहें आणि तिला नेण्यासाठीं मी आलों आहें. "

जगमोहन बाबूंनीं उठून पुरंदराला मानेला धरून पकडलें आणि खोलीच्या बाहेर खेचीत नेऊन त्याला त्यांनीं जिन्यावरून खालीं लोटून दिलें. नंतर त्या नवख्या तरुणाकडे येऊन ते म्हणाले, " तूं तर पक्काच पाजी आणि बदमाष मनुष्य दिसतो आहेस. मोठा भाऊपणाचा हक्क सांगायला आला आहेस. पण या हक्काच्या बळावर तिचें संरक्षण करण्याच्या ऐवजीं तिच्या साऱ्या आयुष्याचें मातेरें मात्र करण्याचा तुझा बेत आहे; दुसरें कांहीं नाहीं. "

त्या तरुणानें तत्क्षणीं तेथून य:पलाय केलें. पण थोडयाशा अंतरावर गेल्यावर, आतां कांहीं जगमोहनबाबू आपल्याला पकडूं शकणार नाहींत अशी त्याची खात्री झाली तेव्हां तेथूनच त्यानें आपली बहीण अजून अज्ञान आहे, तेव्हां तिला आपण कोर्टमार्फतच तुमच्या कचाट्यांतून सोडवितों कीं नाहीं पहा, अशा प्रकारें जगमोहनबाबूंना धमकी घातली.

" आई भूमिमाते, दुभंगून मला एकदां पोटांत तरी घे बाई ! " अशी ननीबालेनें आर्त हृदयानें मनांतल्या मनांत प्रार्थना केली.

इकडे जगमोहनबाबूंनीं सतीशला बोलावून घेतलें आणि त्याला ते म्हणाले, " हें पहा सतीश, हें असें जर फिरून फिरून व्हायला लागलें तर बिचारी ननीबाला जिवंत कांहीं राहणार नाहीं. तेव्हां तूं तिला घेऊन कलकत्त्यापासून दूर कोठें तरी उत्तरेच्या बाजूला प्रवासाला जा पाहूं कांहीं दिवस. "

पण यांतही सतीशनें एक अडचण दाखविली. तो म्हणाला, " आम्ही कोठें गेलों आहोंत याचा कांहीं तरी सुगावा मिळतांच पुरंदर आमचा पाठलाग करीत यायला कांहीं सोडायचा नाहीं. "

" मग आतां काय करावें म्हणतोस तूं ? " जगमोहनांनीं विचारलें.

" माझें आणि ननीचें लग्न लावून द्या. "

" ननीचें आणि तुझें लग्न ! "

" हो. नोंदणीच्या कायद्याप्रमाणें तावडतोब आम्हांला कायदेशीरपणें लग्न करून घेतां येईल. "

जगमोहनबाबू उठून सतीशजवळ गेले आणि सतीशला त्यांनीं आपल्या हृदयाशीं घट्ट धरलें.

* * *

वाटणी झाल्यापासून हरिमोहनबाबू आपल्या भावाकडे एकदांसुद्धा तोंड दाखवायला किंवा विचारपूस करायला कधीं आले नव्हते. पण आज मात्र ते उघडेबोडके आणि आंघोळ वगैरे न करतांच जगमोहनांच्याकडे आले, आणि म्हणाले, " दादा, हें काय भलतेंच संकट; सत्यानाश उभा करायचा विचार चालविला आहे तुम्हीं ! "

" वारे वा ! संकटांतून, सत्यानाशांतून एकूण एक सर्वांना वांचवावें यासाठीं तर माझी सारी खटपट चालू आहे, " जगमोहनबाबूंनीं उत्तर दिलें.

त्यावर हरिमोहनबाबू म्हणतात, " अहो, सतीश म्हणजे तुम्हांला पोटच्या मुलासारखा. त्याचें आणि या बाजारबसवीचें लग्न व्हावें असें तुमच्या मनांत तरी कसें येतें ! "

जगमोहनबाबूंनीं उत्तर दिलें, " हो, सतीशला खरोखरच माझ्या पोटच्या मुलाप्रमाणें मी वाढविलेला आहे. आणि आज त्यानें माझ्या आजपर्यंतच्या साऱ्या कष्टांचें चीज केलें याबद्दल मला धन्यता वाटते आहे ! ! "

" दादा " हरिमोहनबाबू काकुळतीला येऊन म्हणाले, " हात जोडतों मी तुमच्यापुढें. तुम्ही माझा अगदीं पुरा पुरा पराभव केला आहे हें कबूल आहे मला. तुम्हांला हवें असलें तर माझ्या उत्पन्नांतला निम्मा हिस्सा मी तुम्हांला तोडून देतों; पण कसेंही करा आणि माझ्यावर हा असा सूड नका हो उगवूं ! "

" म्हणजे कुत्र्यापुढें एखादें हाडूक चघळायला टाकून त्याला गप्प करावें त्याप्रमाणें स्वतःच्या पानांतलें उरलें सुरलें खरकटें माझ्या तोंडावर

टाकायला पाहतो आहेस म्हणायचा तूं. पण नीट लक्षांत ठेव—मी आहे सरळ सरळ नास्तिक माणूस. तुमच्यासारखा कांहीं कोणी पवित्र धर्मात्मा नव्हे मी. म्हणून मी कोणाचा सूडही घ्यायच्या भानगडींत कधीं पडत नसतों आणि कोणी माझी माफी मागायला यावें अशीहि माझी कधीं अपेक्षा नसते!!

यावर हरिमोहनबाबू वेगानें निघाले ते तडक सतीशच्या खोलीकडे गेले. तेथें पोंचतांक्षणींच सतीशच्या आंगावर खेकसून म्हणाले, "सतीश! अरे हा तूं प्रकार मांडला आहेस तरी काय? स्वतःच्या पायावर धोंडाच पाडून घ्यायची लहर तुला आली होती तर त्यासाठीं जगांत काय यावांचून दुसरा उपायच नव्हता का? सगळ्या घराण्याच्या तोंडाला इतकी घाणेरडी काळोखी फासून छी थू करून घ्यायला कां तूं निघाला आहेस?"

सतीशनें शांतपणें उत्तर दिलें, "मला म्हणजे लग्नाची एवढी उतावीळी झाली आहे असें मुळींच नाहीं. पण आपल्या कुटुंबाच्या अब्रूला हिडीस काळोखी लागूं नये या एकाच इच्छेनें इतक्या लौकर लग्नाला तयार झालों आहें मी." आश्चर्याचा भयंकर धक्का बसल्यासारखे होऊन हरिमोहन म्हणाले, "म्हणजे सारासार विचाराचा, पापपुण्याचा, रेसभरसुद्धां अंश तुझ्या बुद्धी-मध्यें शिल्लक राहिला नाहीं असाच याचा अर्थ का? अरे ही पोरटी, प्रत्यक्ष तुझ्या भावाची जवळ जवळ बायकोसारखी म्हणेनास—"

रागानें त्यांना मध्येंच आडवून सतीश ओरडला, "बायकोसारखी! बोलायला कांहीं वाटतें तरी तुम्हांला. माफ करा. त्या शब्दाची तरी अशी ही विटंबना करूं नका!" त्यावर हरिमोहनांनीं त्याला वाटेल तशा अद्वातद्वा शिव्या द्यायला सुरवात केली. पण सतीशनें मात्र पुन्हां तोंडांतून एक शब्द सुद्धां काढला नाहीं.

पण हरिमोहनांना ज्या काळजीनें सगळ्यांत जास्त घेरलें होतें ती याहून वेगळीच होती. सतीशनें ननीशीं लग्न केलें तर आपण जीव देणार अशी म्हणे पुरंदरनें धमकी घातलेली होती. त्यावर पुरंदरच्या बायकोनें चक्क त्याला सांगितलें होतें कीं. "अहो, एवढी गोष्ट करण्याची धमक सुद्धां तुमच्या आंगांत नाहीं, पण खरोखरच एवढा मर्दपणा तुमच्या हातून घडला तर देशाची समजांच्यावरच मोठी खैर झाल्यासारखी होईल; साऱ्यांच्याच पाठी-

माझ्याची कटकट चुकेल. दाखवाच तुम्ही एवढें शूरपण!" पण ननी-सतीशानें हें जर केलें तर पुरंदर खरेंच आपल्या जिवाचें बरें वाईट करून घेईल या काळजीनें हरिमोहनांना मात्र घेरलें होतें आणि म्हणून ते एवढी ही धडपड करीत होते.

* * *

इतके दिवस सतीश मुद्दाम होऊन ननीपासून दूरदूरच राहत असे. पण त्यांच्या लग्नाचें जेव्हां पक्के झालें तेव्हां लग्नाआधीं त्या दोघांनीं एकमेकांशीं बोलून बसून परस्परांचा परिचय करून घ्यावा अशी कल्पना जगमोहनबाबूंनीं काढली. सतीशची त्याला ना नव्हतीच.

म्हणून त्यांच्या या भेटीच्या पहिल्या संभाषणाचा एक दिवस काकांनीं कायम केला. त्या दिवशीं ते ननीला म्हणाले,

"माझे बाई, आजच्या दिवशीं तुला जरा चांगलासा पोशाख करायला हवा."

तोंडांतून एक शब्दही न काढतां ननी जमिनीवर नजर खिळवून स्तब्ध उभी राहिली.

म्हणून ते पुनः म्हणाले, "वा! असं लाजून कसं बरं चालेल, ननी? चांगली सुंदर साडी नेसून केस साफ करून इकडे तिकडे अंगाखांद्यावर थोडें काहीं तरी घालून थोडीशी आनंदानें इकडे तिकडे फिरतांना तुला पाहावें असें स्वतः माझ्यासुद्धां किती किती मनात आहे. मग माझ्यासाठीं तरी एवढें करणार ना तूं?" असें म्हणून त्यांनीं मुद्दाम तिच्याकरितां आणलेली बनारसी रेशमी साडी, तोंडावरून घ्यायची ओढणी आणि पोलकें, वगैरे जिन्नस तिच्या हातांत दिले.

अकस्मात् खालीं पडून ननीनें त्यांच्या पायावर जणूं लोळण घेतली. त्यासरशीं जगमोहनबाबू झटकन उठून उभे राहिले आणि पाय तिच्या हातांतून ओढून दूर करून म्हणाले,

"पोरी, ननी, कोणाहीबद्दल असली ही खुळचट आंधळी भक्तिभावना दाखविण्याची पद्धति किती चुकीची आहे हें आजवर तुला समजून सांगायची मी जी खटपट केली ती सारी मग फुकटच गेली म्हणायची. मी तुझ्यापेक्षां वयानें किती जरी मोठा असलों तरी मानानें तूंच माझ्या-

पेक्षां मोठी आहेस. तुझा मान माझ्या आईचा आहे, हें मी तुला कितीदां तरी नाहीं का सांगितलें बरें !

पण तिनें एक शब्दही तोंडावाटें काढला नाहीं. मग त्यांनीं तिच्या मस्तकाचें अवघ्राण केलें आणि तिला सांगितलें, " आज मला बाहेर एकीकडे जेवायला जायचें आहे, तेव्हां घरीं यायला मला थोडा उशीर होईल, समजलीस ना. "

ननीबालेनें त्यांचे हात आपल्या हातांत घट्ट धरले; आणि " पण बाबा, आज तुम्ही मला आशीर्वाद द्यायलाच हवा " एवढें वाक्य कसें बसें तिच्या तोंडातून बाहेर पडलें.

त्यावर जगमोहनबाबू म्हणाले,

" माझे आई, म्हातारपणीं आतां मला नास्तिकाचा आस्तिक बनविण्याचा तुझा निश्चय झालेला दिसतो आहे. या आशीर्वाद वगैरेंना मी स्वतः एका कवडीची सुद्धां किंमत देत नाहीं. पण आज तुझ्या चेहऱ्याकडे पाहिल्यानंतर--नव्हे केव्हांहि तुझ्याकडे पाहिलें कीं आशीर्वाद देत नाहीं असं म्हणायची कांहीं माझी हिंमत होत नाहीं. "

असें म्हणून जगमोहनांनीं तिच्या हनुवटीखालीं हात घालून तिचें तोंड जरा वर उचललें आणि कांहीं न बोलतां कितीतरी वेळ तिच्याकडे ते नुसते टक लावून पाहत राहिले. इकडे ननीच्या डोळयांतून अश्रूंचा जणूं पूर वाहून चालला होता.

२

जगमोहन ज्या घरीं जेवावयाला गेले होते त्या घरीं संध्याकाळच्या सुमारास, धांवतच एक मनुष्य आला आणि त्यानें त्यांना तडक घरीं आणलें.

घरीं येतात तों त्यांच्या समोर ननीबालेचा मृत देह! त्यांनीं दिलेलें साडी पोलकें तिनें घातलें होतें. इतरहि साज घातलेला होता. तशीच तो बिछान्यावर ताठ पडलेली होती. तिच्या हातांत एक पत्र धरलेलें होतें. डोक्याशीं सतीश उभा होता. जगमोहनांनीं तें पत्र घेऊन वाचलें.

" बाबा. क्षमा करा मला. तुम्ही म्हणतां तसं नाहीं हो मला करवत. तुमच्यासाठीं म्हणून किती किती प्रयत्न केला मी खरोखर; पण कांहीं केल्या

त्यांची मूर्ति माझ्या डोळ्यांतून हालतच नाहीं हो. म्हणून तुमच्या पूज्य चरणांप्रत सहस्रशः प्रणाम आहेत माझे.

—पापिणी ननीबाला "

## प्रकरण दुसरें : : सतीश

जगमोहनबाबू अगदीं हाडाचे नास्तिक. तेव्हां सतीशला अगदीं अखेरचें म्हणून ते जेव्हां बोलले, तेव्हांसुद्धां त्यांनीं त्याला मुद्दाम बजाविलें कीं, " मेलेल्या माणसाचे निरनिराळया प्रकारचे अंत्यविधि करायची तुला विशेष हौसच असली तर, बाबा रे, ती तुझ्या वडिलांच्या वेळेपर्यंत तशीच राखून ठेव, तुझ्या काकाच्या वेळीं कांहीं ती फेडून घेऊं नकोस. "

त्यांच्या मरणाची हकिकत ही अशी घडली :

कलकत्त्याला या सुमाराला नुकताच प्लेगचा प्रादुर्भाव झाला होता. त्यामुळें गरीब लोकांच्या वर आणखीच एक भलतेंच संकट येऊन उभें राहिलें होतें. त्या बिचाऱ्यांना प्रत्यक्ष प्लेगाची कांहीं इतकी भीति वाटत नसे. पण प्लेग-प्रतिबंधक खात्याचे बिल्ले लटकावून फिरणारे जे नोकर लोक असत त्यांचीच त्यांना फार मोठी भीति वाटे. सतीशच्या वडिलांनीं असें पाहिलें कीं, आपल्या शेजारची ही जी मुसलमानांची, चांभारांची, ढोरामांगांची वस्ती तिच्या-मध्येंच पहिल्या प्रथम प्लेग पसरणार, आणि मग त्यांच्या संसर्गानें आपल्या-वर आणि आपल्या पोरांबाळांवर पण ही संक्रांत ओढवणार. म्हणून त्यांनीं घर सोडून यःपलाय केलें. पण आपल्या वडील बंधूंवरही जातां जातां कांहीं उपकार करतां आले तर पाहावें या हेतूनें, घर सोडून निघण्यापूर्वीं त्यांच्या-कडे जाऊन ते म्हणाले, " गंगाकाठीं कलना गांवामध्यें मीं एक घर ठरवलें आहे. तेव्हां तुम्ही जर—"

पण जगमोहनबाबू मध्येंच त्यांना म्हणाले, " छे, छे, असं कसं होईल ! या गरीब बिचाऱ्या लोकांना सोडून मी कसा दुसरीकडे जाऊं ? "

" कोणते लोक ? " हरिमोहनांनीं विचारलें.

" हे आमचे कातडी मालाचा धंदा करणारे बांधव. "

अत्यंत तिरस्कारव्यंजक असें वांकडें तोंड करून कांहीं एक न बोलतां हरिमोहनबाबू तेथून निघून गेले. तेथून जे ते उठले ते आपल्या मुलाच्या बिऱ्हाडीं गेले आणि मागचें पुढचें कांहीं एक न सांगतां एकदम त्याला म्हणाले, " हं, चल आटप; माझ्याबरोबर जायचं आहे तुला !! "

सतीशनें पण अगदीं तितक्याच मोजक्या शब्दांत उत्तर दिलें, " मला येथें काम आहे. "

" हूं ! या चांभारड्यांचीं प्रेतें वाहण्याचें काम असेल ! "

" होय; वेळच पडली तर तें सुद्धां ! समजलांत ! "

" म्हणे, 'हो, समजलांत !' लाज नाहीं वाटत बोलायला ! गाढव, मूर्ख, बेशरम, पाखंडी कुठला. वेळ आली तर तूं आपल्या चौदा पिढ्यांना सुद्धां नरकांत लोटायला मागें पुढें पाहाचा नाहींस यांत मला काडीची सुद्धां शंका नाहीं."

कलियुगाची आतां अगदीं परमावधि झाली; तेव्हां आपल्या पोटच्या पोराला सुद्धां पापमार्गापासून बचावणें आपल्याला आतां शक्य नाहीं, अशी खात्री होऊन निराश अंतःकरणानें हरिमोहन घरीं परतले. हा संसर्गदोष आपल्याला बाधूं नये म्हणून त्यांनीं आपल्या सुंदर वाटोळ्या अक्षरामध्यें कित्येक तावचे ताव सर्व–विघ्न–विनाशिनी काली मातेच्या नांवानें भरून काढले.

पुढें ठरल्याप्रमाणें कलकत्त्याहून त्यांनीं प्रयाण केलें. त्यांच्या मोहल्यांत प्लेगानें प्रवेश केला. रीतीप्रमाणें प्लेगाच्या पाठोपाठ प्लेगप्रतिबंधक खात्याच्या अधिकाऱ्यांचा आणि नोकरांचाही तेथें प्रवेश झाला. पण घरांत प्रत्यक्ष कोणी आजारी पडून तडफडूं लागलें तरी सुद्धां डॉक्टरी मदत मागण्याचें धाडस कांहीं त्या बिचाऱ्या गरीब लोकांच्याकडून होईना. कारण तसें करायला जावें तर सक्तीनें घराबाहेर काढून प्लेगच्या इस्पितळांत आपल्याला नेऊन टाकणार ही भीति त्यांच्यापुढें दत्त म्हणून उभी राही. त्यासाठीं जगमोहनबाबू हे स्वतः जाऊन एकदां तें प्लेगचें हास्पिटल डोळ्यांखालीं घालून आले; पण नापसंतिदर्शक मान हलवून ते म्हणाले, " हा तर बुवा मोठाच जुलूम आहे म्हणायचा. आजारी पडणें म्हणजे माणसाच्या हातून एखादा फौजदारी गुन्हाच झाला असें हे लोक समजतात कीं काय ? "

म्हणून मग त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला; योजना आंखल्या; आणि

शेवटीं एकदां महत्प्रयासानें त्यांनीं आपल्या स्वतःच्या घरांतच इस्पितळ उघडण्याची परवानगी मिळविली. आमच्या बरोबरच्या पुष्कळ विद्यार्थ्यांनीं सतीशला रोग्यांच्या शुश्रूषेच्या कामीं मदत करण्याचें आपण होऊन कबूल केलें. आम्हां मंडळीमध्यें परीक्षा पास झालेला एक डॉक्टर पण होता.

आमच्या या इस्पितळांत आलेला पहिला रोगी होता एक मुसलमान. तो बिचारा मेला. त्यानंतरचा दुसरा रोगी म्हणजे स्वतः जगमोहनबाबू. तेही कांहीं वांचूं शकले नाहींत. आजारी होतांच ते सतीशला म्हणाले, " आजपर्यंत ज्या धर्माचें पालन मी करीत आलों त्याचें हें उत्तम असेरचें फळ मला मिळतें आहे. म्हणून कोणालाच कांहीं वाटून घेण्याचें कारण नाहीं."

जिवंतपणीं आपल्या काकांच्या पायाची धूळ सतीशनें आपल्या कपाळाला केव्हांच लावलेली नव्हती. पण जगमोहनांनीं प्राण सोडल्यावर त्यानें या सनातन पद्धतीनें त्यांना प्रथमच अभिवादन केलें. या पद्धतीचें त्याचें त्यांना हें पहिलें आणि शेवटचें असें एकच अभिवादन होतें.

प्रेतदहनाहून परत आल्यावर सतीशला पाहतांच हरिमोहन म्हणाले, " नास्तिक लोकांना हें अगदीं असेंच मरण यायचें ! "

" अगदीं बरोबर आहे ! " सतीशनें मोठ्या अभिमानानें त्यांना उत्तर दिलें.

२

दिव्याची ज्योत विझल्याबरोबर प्रकाश जसा एकदम आणि जिथून तिथून सगळीकडून नाहींसा होतो तसा काकांच्या मृत्यूनंतर सतीश नाहींसा झाला. तो गेला कोठें, त्याचें झालें काय याचा आमच्यापैकीं कोणाला कांहीं मागमूस सुद्धां राहिला नाहीं.

सतीशचें आपल्या काकांच्यावर किती गाढ प्रेम होतें याचा आम्हांला कोणालाच खरा थांग लागलेला नव्हता. जगमोहनबाबू त्याला आपल्या वडिलांप्रमाणेंच वाटत; तसेंच ते आपले एक उत्कृष्ट स्नेही अशीही त्याची भावना होती. पण याहूनही विशेष म्हणजे एका अर्थी ते त्याला आपल्या मुलांसारखेहि होते. कारण इतकें वय जरी झालें होतें तरी हे गृहस्थ स्वतःची काळजी म्हणून काळजी घेऊं शकत नसत. आपल्या व्यवहारांतल्या साऱ्याच

गोष्टींबद्दल ते इतके निष्काळजी असत कीं सारा वेळ सतीशलाच त्यांचें कधी जास्त पहावें लागे आणि त्यांना कोणी फसवीत नाहीं ना, कांहीं कोठें अडचणींत ते सांपडत नाहींत ना याबद्दल डोळ्यांत तेल घालून त्याला जपावें लागे. अशा रीतीनें एका अर्थी सतीशनें आपल्या काकांकडून सर्वस्व मिळविलें होतें. तर दुसऱ्या अर्थी त्यानें आपलें सर्वस्व त्यांना दिलें पण होतें.

आपल्या सर्वस्व अशा प्रियजनविरहामुळें दुःखानें सतीशच्या हृदयाचें किती पाणी पाणी झालें असेल, साऱ्या जगांत आपण निराधार झालों असें त्याला किती वाटलें असेल याची कल्पना आम्हांला येणें अर्थातच अशक्य होतें. मात्र त्याच्या अंतःकरणाला जिकडे तिकडे सगळें शून्य भासूं लागलें होतें. जगांत प्रत्यक्ष सत्य म्हणून कांहीं वस्तु तरी आहे कीं नाहीं इतकें त्याला सगळीकडे पोकळ पोकळ भासूं लागलें होतें. पण दुसरीकडे त्याची बुद्धि तर त्याला सांगत होती कीं, हें असें असणें शक्य नाहीं; कोठें कशाला कांहीं अस्तित्वच नाहीं असा प्रचंड नास्तिरूपाचा-अभावरूपाचा भास होतो त्याच्या ठिकाणींच सत्तत्वाचा अस्तिरूपाचा कांहीं भावच नसेल तर मग आ पसरून बसलेल्या या अभावरूप भगदाडामध्यें सारी सृष्टीच शून्यत्वांत विलीन व्हावयाची. अशा रीतीनें अभावाच्या तळमळ उत्पन्न करणाऱ्या आभासाच्या तावडींतून स्वतःला मुक्त करण्यासाठीं त्याच्या जिवाची तगमग चालली होती.

दोन वर्षेंपर्यंत सतीश एकसारखा कोठें ना कोठें तरी भटकत होता.— आम्हांला त्याची कांहींच खबर नव्हती. आम्हीं आपल्यावर जीं कांहीं कामें पत्करून घेतलीं होतीं तीं पार पाडण्यांतच आम्हीं आपलें चित्त गुंतवून टाकलें होतें. ज्यांची ज्यांची म्हणून धर्माबद्दल श्रद्धा असेल, मग ती कोणत्याही धर्माबद्दल असो त्यांच्या धर्मश्रद्धेला चांगले जोरानें धक्के द्यावयाचे हें एक आमचें खास काम म्हणून आम्ही योजलेलें होतें. आणि या आमच्या लोककल्याणाच्या कामासाठीं आम्ही असेंच क्षेत्र निवडून काढलें होतें कीं आमच्या आजूबाजूला कोणीही भला माणूस आमच्याबद्दल एक चांगला शब्द बोलेल तर शपथ अशी अवस्था आम्ही करून टाकली होती. आमच्या या कार्यरूपी वृक्षावरचें फूल होता सतीश. तें फूल जेव्हां गळून पडलें तेव्हां मागें राहिलों आम्ही निव्वळ काटे; पानाफुलांचा नाजूकपणा आतां आम्हीं

दूर भिरकावून दिला होता. आणि आमच्या ठिकाणच्या टोंचदारपणाबद्दल आम्ही स्वतःला धन्य समजूं लागलों होतों.

३

सतीश आमच्याकडून नाहींसा होऊन गेल्याला आतां दोन वर्षें होऊन गेलीं होतीं. त्याच्याबद्दल कसलाही वावगा विचार मनांत आणणें म्हणजे खरोखरच माझ्या जिवावरची गोष्ट होती. तरी पण सदैव अगदीं तार-सप्तकापर्यंत खेंचलेली त्याच्या जीवितक्रमाची तार या धक्क्यामुळें तुटून अगदींच ढिली तर पडली नाहीं ना अशी शंका माझ्या मनाला मधून मधून बोंचल्याशिवाय कांहीं राहात नसे.

संन्यासी लोकांबद्दल बोलतांना जगमोहनकाका एक दिवशीं म्हणाले होते कीं, " सराफ ज्याप्रमाणें नाणें कशावर तरी वाजवून त्याचा आवाज बद नाहीं ना असें पाहून त्याची पारख करीत असतो त्याच तऱ्हेची पारख ह्या जगांत प्रत्येक माणसाची पण होत असते. नुकसान आणि दुःख यांचा धक्का कोण कशा रीतीनें सहन करतो; आणि स्वस्ताईच्या बाजारांत अल्प मोलानें मोक्ष मिळविण्याच्या मार्गापासून कोण किती दूर राहूं शकतो यावर माणसाची किंमत ठरत असते. या दृष्टीनें पाहतां जगामध्यें साधु म्हणून भटकणारे हे सगळे लोक म्हणजे जगाच्या बाजारांत बिन किंमतीचे ठरल्या-मुळें दूर फेंकून देण्यांत आलेले लोक होत. असें असूनही आपणच जगाच्या संसाराचा त्याग केला अशी फुशारकी मिरविण्याची मात्र या बेकार भटक्यांना लाज वाटत नाहीं. पण सृष्टिचक्राचा धर्मच असा आहे कीं काम करण्याचें ज्याच्या म्हणून आंगीं सामर्थ्य आहे त्याला काम टाकून बाहेर भटकण्याला सवड मिळायचीच नाहीं. झाडावरून खालीं गळून पडण्याला मुभा फक्त वाळल्या कोळल्या पानांनाच असते. "

अशा या वाळून कोळून निकामी झालेल्या लोकांच्या मेळाव्यांत इतर सगळे लोक सोडून आमचा सतीश सामील व्हावा असें तर कांहीं घडलेलें नाहीं ना ? प्रियजनविरहाच्या काळ्या कसोटीच्या दगडावर घासल्याबरोबर तेथें त्याच्या हिणकसपणाचीच रेषा उमटावी असाच तर त्याच्या नशिबाचा योगायोग नव्हता ना ?

अशा प्रकारच्या आशंकांनीं माझ्या अंतःकरणावर हल्ला चढविण्याला सुरुवात केली होती तोंच एकाएकीं आमच्या कानावर वार्ता येऊन थडकली कीं, वैष्णवधर्माचें पुनरुज्जीवन करण्याचें कंकण बांधलेले लीलानंद स्वामी यांचें शिष्यपण पत्करून सतीश (अहो, हो; अगदीं आमचाच सतीश— ) कुठल्याशा एका खेडेगांवीं भजनामध्यें रंगून जाऊन आपल्या टाळांच्या आणि झांजांच्या निनादानें मारे सारें आकाश दुमदुमून टाकीत आहे.

सतीशची माझी अगदीं पहिल्या प्रथम ओळख झाली तेव्हां हा गृहस्थ असा नास्तिक बनूं तरी कसा शकतो याचें कोडेंच मला उलगडत नसे. आणि आतां या लीलानंद स्वामींनीं या गृहस्थाला आपल्या भजन—कीर्तनाच्या घोळक्यांत आपल्याबरोबर नाचायला लावलें तरी कसें हें नवें कोडेंही त्या पूर्वींच्या कोडयाइतकेंच मला कठिण होऊन बसलें होतें.

शिवाय आमच्यापुढें आणखी एक मोठा अवघड प्रश्न असा होता कीं आतां आम्ही लोकांना तोंड तरी कसें दाखवावयाचें ? आमच्या शत्रुपक्षाच्या तळावर आमचें केवढें तरी हंसें होणार—आणि ही शत्रूंची संख्या तरी कांहीं थोडी थोडकी असायची होती. आमच्याच आचरटपणामुळें ही संख्या आतां केवढी अगणित झालेली ! आमच्या मंडळींत तर सगळ्यांना सतीशला अगदीं खाऊं कीं गिळूं असा संताप उसळला. कित्येक जण म्हणूं लागले, "अहो, नाहीं तरी आम्हांला हें पहिल्यापासूनच माहीत होतें कीं हा सतीश म्हणजे नुसता कल्पनातरंगाचा पोकळ फेस; त्याच्यांत बुद्धीचा दृढपणा पाहिला तर रेंसभर सुद्धां नाहीं. बुद्धिवादापेक्षां ध्येयवादाचा बुडबुडाच होता म्हणायचा तो." पण माझें सतीशवर किती प्रेम होतें याचा मला या प्रसंगानें फार चांगला शोध लागला. वास्तविक त्याच्या आणि आमच्या निष्ठावंत नास्तिक मतवादी संघावर आपल्या वर्तनानें त्यानें जणुं यमपाशच आवळले होते. आणि असें असूनही त्याचा मला राग कांहीं वाटूं शकत नव्हता.

४

उलट हे लीलानंदस्वामी कोठेंसे आहेत ते हुडकून काढण्यासाठीं मी धांवाधांव सुरू केली. नद्यांमागून नद्या किती ओलांडल्या, भलीं लांबरुंद

विस्तीर्ण माळरानें पायाखालीं तुडविलीं. रात्रींच्या रात्रीं कोठें तरी भेटेल त्या वाण्याच्या दुकानामध्यें काढल्या. शेवटीं एकदांची एका खेडेगांवांत सतीशच्या भजनीमंडळाशीं माझी गांठ पडली.

त्या वेळीं दुपारचे दोन वाजलेले होते. कसें तरी करून सतीश एकटाच एकीकडे भेटावा असें माझ्या फार मनांत होतें. पण तसें कुठलें घडायला ? स्वामीजींनीं आपल्या निवासानें जी झोपडी पावन केलेली होती, तिच्यामध्यें त्यांच्या शिष्यगणांची मारे खेंचगर्दी उसळली होती. सकाळपासून भजन-कीर्तनाचीच आणि भक्तिमय नाचांची धून हा वेळपर्यंत माजून राहिली होती. लांबलांबून लोक आलेले होते ते, आतां जेवायला वाढतील मग वाढतील म्हणून वाट पाहत तिष्ठत बसलेले होते.

तरी पण माझी त्याची दृष्टादृष्ट होतांच एवढ्या सगळ्यांमधूनही सतीशनें मजकडे धांव घेतली आणि त्यानें मला अगदीं कडकडून घट्ट मिठी मारली. मी तर आश्चर्यानें मूढ होऊन गेलों. सतीश म्हणजे आम्हांला एक घुम्या आणि अत्यंत संकोची वृत्तीचा म्हणून ठाऊक. त्याच्या अंतःकरणांतील भावनेचा गाढपणा मोजण्याचें फक्त एकच साधन आमच्या ओळखीचें, तें म्हणजे त्याचा बाह्य शांतपणा आणि गंभीरपणा. आणि असा हा आमचा सतीश त्या क्षणीं जणुं झिंगल्यासारखा वागत होता माझ्याजवळ.

झोंपडीच्या ओसरीवरच स्वामीजी विश्रांति घेत पडलेले होते. मात्र ओसरिचें दार अर्धवट किलकिलें होतें. आम्ही स्वामीजींना दिसत होतों. एकदम आंतून गंभीर हुकुमी आवाजांत हांक आली,

" सतीश "

तत्क्षणीं मोठ्या लगबगीनें सतीश आंत गेला.

" कोण आहे तें ? " स्वामींनीं विचारलें.

" श्रीविलास; माझा एक फार मोठा स्नेही, " सतीशानें उत्तर दिलें.

गेल्या कांहीं वर्षांत आपल्या या छोट्याशा जगांत मी स्वतःची बरीच प्रसिद्धी करून घेतलेली होती. माझें इंग्रजी भाषेंतील वक्तृत्व ऐकून एका इंग्लिश गृहस्थानें तर असें मत प्रदर्शित केलें होतें कीं, "या गृहस्थाच्या ठिकाणीं फार आश्चर्यकारक—" पण जाऊं द्या. उगीच हें सारें सांगून माझ्या शत्रूंच्या संख्येंत भर पडेल असें कशाला करा ! एवढें सांगितलें म्हणजे पुरे

कीं लहान विद्यार्थ्यांपासून तों त्यांच्या आजापणजापर्यंत माझी कीर्ति चांगलीच पसरलेली होती. एक दंगेखोर नास्तिक म्हणून तर लोक मला ओळखतच असत; पण इंग्रजी भाषारूपी घोडीवर लीलेनें ढेंग टाकून वाटेंत कसल्याही खाचखळग्यांची किंवा अडचणींची बिलकूल फिकीर न करतां प्रलयवायूच्या वेगानें तिला भरधांव फेंकणारा वक्ता अशीही माझी ख्याति झालेली होती.

मला तसें कां वाटावें कोण जाणे, पण त्या ठिकाणीं मी आल्यामुळें स्वामीजींना समाधानच वाटलें असावें असें मला वाटलें हें खरें. त्यांनीं लगेच मला आंत बोलावून घेतलें. दारांतून आंत शिरतांना जनरूढीप्रमाणें स्वामीजींना नमस्कार करायला हवा तो केल्याचा नुसता जरा भास मात्र मी दाखविला. म्हणजे काय कीं हात जोडून जरी मी थोडे वर उचलल्यासारखे केले तरी मान मात्र जशीच्या तशी ताठ ठेवून मी पुढें गेलों.

स्वामीजींच्या नजरेंतून कांहीं ही गोष्ट निसटली नव्हती. " हें पहा सतीश, " त्यांनीं हुकूम सोडला, " माझी चिलीम भर पाहूं तेवढी. "

सतीश लगेच त्या कामाला लागला. पण त्यानें तिकडे काडी पेटविली त्या वेळीं इकडे माझ्या अंतःकरणाचा मात्र खरोखर नुसता भडका उडाला. त्यांतच भरीला बसायला कोठें नीटशी जागा न सांपडल्यामुळेंही मी थोडासा तिरवटल्यासारखा झालों होतों. खोलीमध्यें बैठक अशी काय ती एक लांकडी खाट होती. पण तिच्यावर स्वामीजींचें आसन पसरलेलें होतें. अर्थात् एवढे मोठे गृहस्थ ज्या आसनावर बसलेले, त्या आसनाच्या एका बाजूला आपण कसें बसावें अशा प्रकारच्या चुळबुळीमुळें मी त्या ठिकाणीं बसण्याचें टाळलें असा मात्र मुळींच प्रकार नव्हता. पण मी तेथें बसलों नाहीं ही गोष्ट मात्र खरी. दाराच्या जवळच मी आपला उभा उभाच होतों.

मला प्रेमचंद रायचंद शिष्यवृत्ति मिळाली असल्याचें स्वामीजींना ठाऊक होतेंसें दिसलें. ते मला म्हणाले, " मोती काढणाऱ्या कोळ्याला समुद्राच्या तळाशीं बुडी मारून जातां आलें तर त्यांत त्याचें कल्याण आहे खरें. पण उद्यां जर त्याला कोणी म्हणूं लागलें कीं, त्या तळाशींच तूं वसति करून रहा म्हणून तर त्यांत त्याचें मरणच ओढवेल. प्राणधारणाला

आवश्यक अशा श्वासोच्छवासासाठीं त्याला तेथून बाहेर जगांत आलेंच पाहिजे. त्याचप्रमाणें तुला जर खरोखर जिवंत राह्यचें असलें तर तुला तुझ्या या विद्येच्या अंधाऱ्या गुहेंतून–विवरांतून बाहेर वर प्रकाशामध्यें आलें पाहिजे.

"विद्यार्जनाचीं फळें आतांपर्यंत तूं चाखलींच आहेस. आतां विद्यार्जनाचा त्याग केला असतां जो आनंद–लाभ होता तो थोडासा चाखून पहा."

चिलीम पेटवून सतीशनें ती स्वामीजींच्या हातांत दिली आणि आपण स्वत: स्वामीजींच्या पायाशीं नुसत्या जमिनीवरच तो बसला. स्वामीजी सहज असे मागें लवंडले आणि आपले पाय त्यांनीं सतीशच्याकडे लांबविले. सतीश त्यांचे ते पाय हलक्या हातानें चुरूं लागला. आतां मात्र मला हें अगदीं असह्य झालें. खोलींतून मी बाहेर निघून गेलों. स्वामीजी सतीशला हे जे हुकूम सोडीत होते, त्याला त्यांनीं हें जें सेवेला जुंपलें होतें त्या सगळयाचा रोख जाणून बुजून माझ्यावर होता हें कांहीं मला समजत नव्हतें असें नव्हे.

स्वामीजी तशीच विश्रांति घेत पडून राहिले. इकडे आलेल्या सर्व पाहुण्यांना घरमालकानें खिचडीचें जेवण घातलें. पांच वाजल्यावर कीर्तनाला पुन्हां सुरुवात झाली. रात्रीचे दहा वाजेपर्यंत भजन–कीर्तनाची ती धून एकसारखी चालूच होती.

शेवटीं एकदां सतीश जेव्हां मला एकटा सांपडला तेव्हां त्याला मीं म्हटलें, "केवढें आश्चर्य आहे हें सतीश! अरे लहानपणापासून तूं व्यक्तिस्वातंत्र्याच्या वातावरणामध्यें वाढलास. आणि आज या अशा गुलामगिरींत तूं सांपडला आहेस! हें आहे तरी काय? जगमोहन काका तुझ्यामाझ्यामधून अगदीं इतके पार नाहींसे झाले का कीं त्यांच्या शिकवणीची एवढीशी खूणसुद्धां तुझ्या ठिकाणीं राहूं नये?"

कांहीं अंशीं प्रेमळ लडिवाळपणें म्हणा, तर कांहीं अंशीं माझ्या स्वभावादिकांचें यथार्थ वर्णन करण्यासाठीं तसें करणें जरूर होतें म्हणून म्हणा, पण सतीश नेहमीं माझ्या नांवांतील पहिल्या दोन अक्षरांची अदलाबदल करून मला विश्री अशी हांक मारीत असे. त्याप्रमाणें तो म्हणाला,

"विश्री, काका होते तेव्हां त्यांनीं मला संसाराच्या कार्यक्षेत्रांत वाटेल

तसें वागायला पूर्ण मोकळीक दिलेली होती. पण मुलांना खेळण्याच्या मैदानावर हवें तसें बागडायला मोकळीक असते ना तशा प्रकारची ही मोकळीक होती. आपल्या मृत्यूनंतर त्यांनींच मला पुन्हां भावनांच्या भरल्या समुद्रावर विहार करण्याला पूर्ण मोकळीक दिलेली आहे; खेळून, दमून भागून मूल परत आलें आणि आपल्या आईच्या गोड हातांच्या घट्ट मिठींत तें बिलगलें म्हणजे तेथें त्याला ज्या प्रकारचें स्वातंत्र्य मिळतें तशा प्रकारचें हें माझें नवें स्वातंत्र्य आहे. जीविताच्या ऐन मध्यान्ह काळच्या स्वातंत्र्यसुखाचा अनुभव मी घेतला आहे; आतां त्याच जीविताच्या सायंकालीन स्वातंत्र्याच्या उपभोगाची संधि मला मिळालेली आहे ती मी कां न साधावी? पण हें तूं पक्कें लक्षांत ठेव कीं या दोन्ही गोष्टी मला काकांच्या अनुग्रहामुळेंच प्राप्त झालेल्या आहेत.

"तूं काय वाटेल तें जरी म्हटलेंस" मी पुन्हां आग्रहानें म्हणालों, "तरी चिलीमच भरून दे, पायच चेप, असल्या या प्रकारांना काकांनीं कधीं म्हणून थारा दिला नसता. हें कांहीं व्यक्तिस्वातंत्र्याचें चित्र नाहीं हें खास."

आपलें म्हणणें माझ्या गळीं उतरविण्याच्या उद्देशानें सतीश म्हणाला, "त्या वेळचें तें स्वातंत्र्य समुद्राच्या पाण्यावरचें स्वातंत्र्य नव्हतें. त्या वेळीं आम्ही समुद्रकांठच्या वाळूंत बागडत होतों; आणि म्हणून काकांनीं आम्हांला हवें तसें नाचायला फुरसत दिली होती. आतांही आम्ही स्वातंत्र्यच उपभोगतों आहों. पण तें भर समुद्रामध्यें उपभोगावयाचें आहे. कांहीं तरी मार्ग आक्रमावा अशी इच्छा असली तर आपल्या या जहाजाला भर समुद्रामध्यें कांहीं तरी काबूंत ठेवण्याजोगीं बंधनें हीं हवींतच. एवढ्याच एका उद्देशानें गुरुजी मला आपल्या सेवेंत बांधून ठेवीत असतात. समुद्रपार होण्याच्या कामीं या पाय चेपण्याचा मला फार चांगला उपयोग होतो."

"तूं म्हणतोस तशा दृष्टीनें पाहिलें तर तुझें बोलणें बरेंचसें पटण्यासारखें वाटतें खरें," मी म्हणालों; "तरी पण आज तुझ्याकडे सेवेसाठीं म्हणून त्यांनीं पाय लांबविले ना तशा रीतीनें एकप्रकारें मगरुरीनें कोणी तुझ्याकडे पाय केलेले मला तरी सहन व्हायचे नाहींत बुवा!"

आपलें म्हणणें जास्त स्पष्ट करण्याच्या उद्देशानें सतीश पुन्हां म्हणाला, "अरे त्यांना अशा प्रकारच्या सेवेची मुळींच गरज नसते. म्हणून तर

ते अशा रीतीनें सेवेची अपेक्षा निःसंकोचपणानें दाखवूं शकतात. स्वतःच्या सुखासाठीं जर ते ही गोष्ट करीत असते तर त्यांना दुसऱ्याकडून सेवा घेण्याची शरम वाटली असती. माझ्या हितासाठीं म्हणूनच केवळ ते हें सगळें करीत असतात."

मला चांगलें समजून चुकलें कीं सतीश कांहीं एका वेगळ्याच जगांत वावरतो आहे, आणि मी जरी त्याचा अगदीं खास दोस्त असलों तरी त्याच्या या जगांत मला कांहीं जागा मिळण्यासारखी नव्हती. सतीशनें मला एवढी मोठी कडकडून आनंदभरानें मिठी मारली खरी; पण ती कांहीं मला; श्रीविलासला—या हाडामांसाच्या विशिष्ट शरीराच्या प्रेमासाठीं म्हणून नव्हे; तर अखिल मानव जातीचा एक प्रतिनिधि म्हणून; विश्वप्रेमाचें फक्त एक भावरूप प्रतीक म्हणून. या असल्या कल्पना म्हणजे निव्वळ दारू-सारख्या ! एकदां का त्या डोक्यांत शिरल्या म्हणजे मनुष्य वाटेल त्याला मिठी मारून डोळ्यांतून पाणी काढील; मग तो प्रत्यक्ष असो नाहीं तर आणखी कोणी सोम्या गोम्या असो; त्याला तें सारखेंच. पण ब्रम्हानंदीं टाळी लागलेल्या अशा या महात्म्यांना अशा आलिंगनापासून किती जरी मोठा आनंदाचा लाभ होत असला तरी माझ्यासारख्या ज्यांना ते मिठी मारणार त्यांना त्यापासून काय लाभ ? मला, विशिष्ट नामरूप धारण कर-णाऱ्या या व्यक्तीला, सृष्टीमधील मित्ररूपता पार नाहींशी करून टाकणाऱ्या विशाळ जळप्रलयामधील एक तरंग मात्र अशा रीतीनें जग ओळखूं लागेल तर त्यापासून मला समाधान कसें व्हावें ?

पण आतां आणखी कांहीं वाद करून उपयोग होण्याचा मुळींच संभव नव्हता. तरीपण सतीशला तेथेंच सोडून निघून जावें अशीही माझ्या मनाची तयारी होईना. म्हणून मारुतीच्या मागें जसें त्याचें शेपूट तसा सतीशच्या मागोमाग मी पण भजन-कीर्तनाच्या धुनीच्या प्रवाहाबरोबर वाहात जाऊन गांवोगांव नाचूं लागलों.

आणि हळूहळू मलाही त्या सगळ्या प्रकाराचा कैफ चढल्यासारखें झालें. मीही जो येईल त्याला मिठी मारूं लागलों; कांहीं कारण नसतां रडूं लागलों. आणि स्वामीजींचे पायही चेपूं लागलों. असें होतां होतां एके दिवशीं माझें मन अत्यंत विलक्षण उल्हासाच्या भरांत असतांना सतीशचें

मला अलौकिक अशा प्रकारचें दर्शन झालें कीं त्याला दैवी या विशेषणाशिवाय दुसरा शब्दच नाहीं.

५

आमच्यासारखे उच्च शिक्षण घेतलेले, चांगले सगळीकडे गाजलेले पूर्वीचे पक्के नास्तिक असे दोन तरुण गृहस्थ शिष्य म्हणून जाळ्यांत सांपडल्यावर लीलानंद स्वामींची चोहोंकडे तेव्हांच प्रसिद्धि झाली. आणि स्वामीजींनीं आपलें ठाणें आतां कलकत्त्यासारख्या राजधानीच्या शहरींच ठेवलें पाहिजे असा स्वामीजींच्या कलकत्त्यांतील शिष्यांनीं त्यांना आग्रह सुरू केला.

त्यांच्या आग्रहासाठीं स्वामीजी कलकत्त्यास येऊन दाखल झाले. शिवतोष या नांवाचे स्वामीजींचे एक अत्यंत श्रद्धाळू आणि निष्ठावान भक्त होते. कलकत्त्यास स्वामीजी केव्हांही आले तरी त्या शिवतोष बाबूंकडेच उतरत असत. स्वामीजींची कृपा होऊन त्यांचा आपल्या घरीं मुक्कामाचा योग आला म्हणजे स्वामीजींची आणि त्यांच्या शिष्यांची बडदास्त राखून सेवा करण्यामध्यें शिवतोषबाबूंना मोठी धन्यता वाटे. मरतेसमयीं आपली सर्व मालमत्ता त्यांनीं स्वामींच्या नांवानें करून ठेवली होती; आणि आपल्या बायकोचा—मूलबाळ त्यांना कोणी नव्हतेंच मुळीं--त्या मालमत्तेवर फक्त तिच्या हयातीपुरता हक्क ठेवला होता. आपलें हें घर म्हणजे आपल्या स्वामीजींच्या पंथाची एक पवित्र धर्मशाळाच व्हावी अशी त्यांच्या मनाची मोठी ओढ होती.

कलकत्त्यास आम्ही जे आतां आलों ते या शिवतोषबाबूंच्याच घरीं उतरलों होतों.

खेडेगांवांमधून भावनाभरांत आम्ही भटकत होतों त्या वेळीं माझ्या मनाला जो एक आनंदाचा उमाळा चढला होता तो आतां कलकत्त्यास आल्यावर मात्र तसाच कायम टिकाविणें कांहीं शक्य होईना. कलकत्त्यास येण्यापूर्वी आमचे पाय या जड पृथ्वीवर नव्हतेच जणु, तर भावनेच्या कांहीं अलौकिक अशा जगांत आम्ही गुंगून बेहोषपणें क्रीडा करीत होतों. त्या जगांत भक्तीचें आमचें एक गूढ नाटक चालू होतें. त्या नाटकांत

आमचें अंत:करण—अंतरात्मा—म्हणजे प्रणयाराधन करणारी नायिका किंवा वधू आणि सर्वांभूतीं भरून राहिलेला आत्मा हा नायक किंवा वर अशा भूमिकेंत आम्ही रंगून गेलेले होतों. आमच्या या नाटकाला आजू-बाजूचें वातावरणही मोठें अनुरूप होतें. खेडेगांवांतील माळरानामध्यें अफाट पसरलेल्या त्या गवताच्या हिरवळी, होड्या आणि मचवे किनाऱ्याला लाग-ण्यासाठीं तयार केलेल्या गर्द आच्छादित जागा, दुपारच्या विश्रांतीच्या वेळीं सर्वत्र भरून राहिलेला परमसंतोषाचा बहर, सायंकाळची गंभीर निस्तब्धता आणि तिच्यामध्यें लहरी उत्पन्न करणारा Cicada ( ? ) पक्ष्याचा कंपित स्वर या सर्वांचा आमच्या नाटकाशीं कसा सुंदर मिलाफ होत असे ! आमच्या त्या स्वप्नमय प्रवासाला खेडेगांवांमधील क्षितिजापर्यंत विशाल पसरलेल्या त्या मोकळया प्रदेशांत मध्यें कसली आडकाठी म्हणून नव्हतीच. पण इथें कलकत्त्यास आल्यावर खेडेगांवांतिल तें तरल वातावरण पार नाहींसें होऊन इथल्या जड वातावरणावर आमचीं डोकीं जणुं आपटूं लागलीं; तिथल्या गर्दीमध्यें आम्हांला जिकडून तिकडून धक्के बसून घुसल्या-सारखें होऊं लागलें आणि पहिलें तें आमचें रम्य सुखस्वप्न पार विल-याला गेलें.

तसें पाहिलें तर कलकत्त्याची आमची ओळख कांहीं नवीन नव्हती. याच कलकत्त्यामध्यें आमच्या विद्यार्थ्यांच्या वसतिगृहाच्या चार भिंतींच्या आत स्वत:ला कोंडून घेऊन आम्हीं आमच्या सगळया शक्ती आमच्या अभ्यासाला वाहिलेल्या होत्या. रात्रंदिवस एक अभ्यासाचाच ध्यास जणुं आम्हीं लावून घेतलेला होता; याच कलकत्त्यांत कॉलेज चौकांत आम्हीं आमच्या बरोबरीच्या विद्यार्थ्यांसह आमच्या देशापुढच्या प्रश्नाची मोठी गंभीर चर्चा करीत होतों. राष्ट्रीय परिषदांच्या वेळीं या शहरांतच आम्ही स्वयंसेवक म्हणून कामें केलीं होतीं. आणि याच कलकत्त्यामध्यें जगमोहन काकांच्या उपदेशाला मान्यता देऊन समाज अथवा राज्यसत्ता यांनीं उत्पन्न केलेल्या गुलामगिरीच्या बंधनापासून स्वत:चीं मनें मुक्त ठेवण्याबद्दलच्या शपथा आम्हीं वाहिल्या होत्या. याच कलकत्त्यांत तारुण्याच्या ऐन दमांत आम्हीं आमचा मार्ग आक्रमीत होतों; आपला असो अगर परका असो, कोणी कशीही निंदा केली तरी आम्ही फिकीर बाळगीत नव्हतों; पुरेंपुरें

मोकळें सोडलेलें जहाज वाऱ्यानें संपूर्ण भरून गेल्यावर ज्याप्रमाणें लाटांची पर्वा न करतां पाणी कापीत पुढें जातें तसा कसल्याही विरोधाला न जुमानतां आमचा कार्यक्रम चालू होता. त्याच या कलकत्त्यांत, त्याच या शहरामध्यें एक झालेल्या या सुखदुःखाच्या तावडींत सांपडून अन्नपाण्याच्या पाठीमागें लागलेल्या आणि फार मोठ्या प्रमाणांत यातनाच सहन करणाऱ्या मानव समाजाच्या भयंकर भोवऱ्यामध्यें आम्हांला आमच्या प्रेमाश्रुपूरित अशा भावसमाधींतून प्राप्त होणाऱ्या परमेश्वरमीलनाची अपूर्व आनंदावस्था टिकवून धरणें आतांच एवढें अशक्य कां व्हावें ?

म्हणून अशी आनंदावस्था टिकवून धरण्याचा मी मोठ्या नेटानें प्रयत्न करीत होतों. पण प्रत्येक पावलागणिक शंकांनीं मला नुसतें घेरून टाकण्याचा सपाटा चालविला होता. मी जातीचा दुबळा तर नाहीं ? स्वतःच्या ध्येयाशीं एकनिष्ठ राहण्याची ताकदच माझ्यामध्यें नाहीं कीं काय ? माझी वृत्ति अव्यभिचारी नाहीं ? कोणतेंही नेटाचें काम दीर्घ प्रयत्नपूर्वक करण्याची माझी पात्रताच नाहीं ? अशा एकेक शंका मला भंडावून सोडीत. म्हणून मग मी सतीशकडे पाहूं लागलों कीं, त्याच्यावर असाच माझ्यासारखा कांहीं परिणाम झाला आहे कीं काय ? पण कलकत्ता या नांवाचा भूतलावर एक विशिष्ट रूपधारी जड पदार्थ आहे अशी थोडीशी सुद्धां जाणिव त्याला असावी असें दाखविणारें एकही चिन्ह मला त्याच्या नजरेंत किंवा तोंडावर आढळलें नाहीं. तो आपल्या त्या गूढ भावमय जगांतच पूर्ण निमग्न होता; आणि त्याच्या त्या जगांत हें शहरी जीवन म्हणजे निव्वळ मृगजळाप्रमाणेंच त्याला वाटत होतें.

६

स्वामीजींच्या बरोबर आम्ही दोघां मित्रांनीं पण आपलें बिऱ्हाड शिवतोषांच्या घरांतच ठेवलें. आम्ही आतां त्यांचे प्रमुख शिष्य बनलों होतों. आणि आम्ही जवळ एकसारखें असावें अशी त्यांची इच्छा असे. स्वामीजींबरोबर आणि आमच्या बरोबरीच्या इतर शिष्यांशीं रात्रंदिवस आमची चर्चा चालू असे ती मानवी भावनांबद्दलच सामान्यतः असे. आणि त्यामध्येंही विशेष म्हणजे आध्यात्मिक भावनेवर, भक्तीच्या तत्त्वज्ञानावर आमचा

भर असे. पण अशा रीतीनें अज्ञानाची अवघड गुंतागुंत उकलण्यामध्यें आम्ही अगदीं पुरे गुंगून गेलेले असतांना मध्येंच कधींकधीं आंतल्या बाजूकडून स्त्री हसिताची लकेर आमच्या कानांपर्यंत येऊन पोंचत असे. तर कधींकधीं स्पष्ट उंच किनारी आवाजांत ' बामी ' अशी हांक मारलेली आमच्या कानावर येत असे. बामी हें अर्थातच घरांतल्या मोलकरणीचें नांव होतें.

कल्पनेच्या दिव्य लोकांत अगदीं आत्मविलोप होऊन जाईपर्यंत भराऱ्या मारणाऱ्या आमच्यासारख्यांच्या मनाला या अशा क्षुद्र गोष्टींचे अडथळे खरें पाहिलें तर कांहींच नव्हता. परंतु मला मात्र हे अडथळे म्हणजे तप्त आणि तृपार्त जमिनीवर पावसाच्या सरींचा झडझडून वर्षाव व्हावा तसे उपकारक वाटले. झाडाखालीं गळून पडलेल्या फुलांच्या पाकळ्या जशा वाऱ्याबरोबर वाहून याव्या तशा रीतीनें आपल्या भिंतीमागच्या त्या अज्ञान जगांतून जीविताचे हे सूक्ष्म झंकार--कंपित स्वर कानावर आले म्हणजे त्या क्षणीं एकाएकीं मला वाटे कीं, अरे ज्या दिव्य स्वर्गाच्या नंदनवनाच्या शोधांत आम्ही मंडळी आहों तें तर अगदीं हें आमच्या शेजारींच--या भिंतीच्या आडच, ज्या ठिकाणीं बामीच्या पदराच्या टोकाला बांधलेल्या किल्ल्यांचा किणकिणाट होतो आहे, जमिनीवरचा केर काढीत असतांना ज्या ठिकाणीं केरसुणीचा आवाज ऐकूं येत आहे आणि स्वयंपाकघरांतून शिजत असलेल्या अन्नाचा स्वाद पसरतो आहे अशा या ठिकाणींच तें आहे. कोणी म्हणेल, काय हें ! किती--क्षुद्र गोष्टी या? पण त्या प्रत्यक्ष आहेत; सत्य आहेत. याच गोष्टींच्या जगांत शुद्ध आणि अशुद्ध, मधुर आणि कटु यांच्या मिश्रणानें युक्त अशा या जगांतच अंतःकरणाचा, भावनेचा पूर्ण अंमल खराखुरा चालत असतो; भावनांचें राज्य जेथें चालतें असा स्वर्ग खरोखर हाच आहे.

शिवतोषांच्या पत्नीचें नांव दामिनी होतें. सहज दार उघडतां मिटतांना किंवा पडदा वाऱ्यानें इकडे तिकडे झाला तर, तर तिचें ओझरतें दर्शन आम्हांला होत असे. पण पुढें स्वामीजींशीं आमची दोघांची इतकी एकरूपता झाली कीं लौकरच दरवाजे किंवा पडदा यांची आडकाठी आमच्याही मार्गांत उभी राहत नाहींशी झाली.

दामिनी म्हणजे आषाढांतील घनदाट जलपूरित मेघांमधून चमकणारी

जणुं वीज होती. बाहेर तिच्या शरीराच्या ठिकाणीं तारुण्याच्या विकासाची रेषान् रेषा कशी पूर्ण उठून दिसत होती. तर तिच्या अंतरंगांत विकाराग्नीच्या कल्लोळांचें थैमान चाललेलें होतें. सतीशच्या रोजनिशींत एक नोंद पुढीलप्रमाणें आढळते:—

" ननीबालेच्या ठिकाणीं जगन्मायरूपी स्त्रीच्या एका स्वरूपाचें दर्शन मला झालें होतें. पापाचा सर्व भार आपल्या शिरावर घेणारी, पापी मनुष्यासाठीं स्वतःच्या प्रत्यक्ष जीविताचा त्याग करणारी आणि मरून आपल्या अमर स्मृतींचा ठेवा जगताला अर्पण करणारी अशा स्वरूपांतली ती स्त्री होती. दामिनीच्या ठिकाणीं जगन्मातेचें मला दुसरेंच स्वरूप आढळून येत आहे. हिचा आणि मृत्यूचा कांहींसुद्धां संबंध नाहीं. जीवनलालित्याची रसनिर्मिती अशी श्रेष्ठ कलाकार जगन्मायाच जणुं ती आहे. गुणरूप, रसगंध आणि गति यांचा विलास करण्यासाठींच तिच्या अंतर्बाह्य शक्ति अमर्याद आणि भरगच्चपणें प्रफुल्लित होत आहेत. त्यागाचा मार्ग तिचा नव्हे; विरक्ताच्या भूमिकेचा ती स्वतःला स्पर्शसुद्धां करूं देणारी नाहीं. आणि व्यक्तिमात्राकडून कर वसूल करणाऱ्या दक्षिणवानाला, वार्धक्याला, एक एवढीशी कवडीसुद्धां द्यावयाची नाहीं असा तिनें निर्धार केलेला आहे. "

येथें दामिनीचा पूर्व इतिहास सांगणें जरूर आहे. दामिनीच्या वडलांचें नांव आनंदबाबू. हे एक जूटचे व्यापारी होते. धंदा ऐन भरभराटींत चाललेला होता. जवळ चांगलीच माया सांठलेली होती. अशा सुमारास त्यांनीं दामिनीचें लग्न शिवतोषाशीं करून दिलें. तोंपर्यंत शिवतोषांची सगळी मालमत्ता म्हणजे काय तें एक त्याचें महान कुल. पण लग्नानंतर या त्यांच्या मालमत्तेत चांगली भरीव भर पडली. कारण, आनंदबाबूंनीं आपल्या जांवयाला कलकत्त्यांत राहण्यासाठीं घर बक्षीस दिलें. आणि त्यांना जन्मभर सुखासमाधानांत दिवस काढतां येतील इतका पैसाही त्यांनीं शिवतोषांना दिला. खेरीज त्यांनीं आपल्या मुलीचा संसार थाटण्यासाठीं इतरही भरपूर सामानसुमान दिलें आणि तिच्या आंगावर जडजवाहिरही घातलें.

याशिवाय आपल्या जांवयाला आपल्या व्यापारधंद्यामध्येंही सामील करून घेण्याचा प्रयत्न आनंदबाबूंनीं करून पाहिला. पण तो निष्फळ झाला. कारण असल्या या सांसारिक व्यवहारव्यापारांकडे जांवईबुवांचें

मुळीं लक्षच नव्हतें. एका ज्योतिषानें त्यांना त्यांच्या कुंडलींत एक महान योग असल्याचें सांगितलें होतें. गोचरीमध्यें अमुक प्रकारचा ग्रहांचा योग जमून आला कीं तत्क्षणीं याच देहीं याच डोळां मोक्ष प्राप्त होणार असा तो योग होता. त्या दिवसापासून त्या भल्या गृहस्थाला केवळ या एकाच आशेनें घेरलें. संपत्तीमध्यें त्याचें चित्त रमेनासें झालें. संपत्तीहूनही अधिक रमणीय अशा संसारामधील इतरही अशा वस्तूंमध्यें त्याला रस वाटेनासा झाला. अशा या मनस्थितींत असतांनाच शिवतोष बाबूंनीं ललितानंद स्वामींचें शिष्यत्व पत्करलें.

दरम्यान इकडे ज्यूटच्या व्यापारामधील तेजी संपून मंदीचा काळ आला. भरभराटीच्या भरगच्च ओझ्यानें भारावलेलें आनंदबाबूंच्या धंद्याचें तारू या मंदीच्या झंझावातांत सांपडून उलटलें. त्यांच्या सर्व मालमत्तेची विक्री झाली. आणि नीटपणें घर संभाळून राहण्यापुरेसा सुद्धां पैसा त्यांचेजवळ राहिला नाहीं.

एक दिवशीं संध्याकाळीं शिवतोष आंतलि बाजूस येऊन आपल्या पत्नीला म्हणाले, " बाहेर गुरुमहाराज आले आहेत. त्यांच्या मनांतून तुला उपदेशाच्या चार गोष्टी सांगायच्या आहेत. आणि त्या ऐकण्यासाठीं तुला त्यांनीं बाहेर बोलावलें आहे. "

पण दामिनीनें उत्तर केलें, " मला कांहीं आतां त्यांच्याकडे यायचें नाहीं. मला फुरसतच नाहीं मुळीं. "

" काय ? फुरसत नाहीं ? एवढें काम तरी काय चाललें आहे ?" म्हणून आश्चर्यानें शिवतोषबाबू तिच्या जरा जवळ जाऊन निरखून पाहूं लागले तों, सायंकाळच्या त्या वाढत्या धूसरप्रकाशामध्यें ती तिजोरी उघडून आंतलि सर्व दागिने पुढें पसरून तिजोरीसमोर बसलेली आहे असें त्यांना आढळून आलें.

" एवढी कसल्या मोठ्या कामांत गुंतली आहेस तरी तूं ? " त्यांनीं तिला विचारलें.

" मी माझे जिन्नस नीट लावून ठेवतें आहे " तिनें उत्तर दिलें. तेव्हां स्वामीजींकडे जायला फुरसत नसायला हें कारण होतें म्हणायचें. केवढें प्रबळ कारण पण !

दुसरे दिवशीं दामिनी तिजोरी उघडून पाहाते तों तिची दागिन्यांची पेटी आंतमध्यें नाहीं.

" माझे दागिने, " असा एकदम उद्गार काढून ती आपल्या पति-राजांकडे चौकस नजरेनें पाहूं लागली.

" पण, ते तर तूं गुरुमहाराजांना अर्पण केलेस कीं—अगदीं त्याच क्षणीं त्यांचा तो संदेश तुझ्या अंतःकरणांत येऊन भिडला नव्हे का?—बरोबर अगदीं नेमक्या क्षणाला. कारण लोकांच्या अंतःकरणांत काय चाललेलें आहे हें स्वामीजींना नेमकें समजतें. तुझ्यावर त्यांची फार मोठी कृपा म्हणून तुला या कनकाच्या मोहांतून वाचविण्यासाठीं त्यांनीं हें सारें घडवून आणलें. "

दामिनी रागानें नुसती लालभडक होऊन गेली. " बऱ्या बोलानें माझे दागिने मला परत द्या पाहूं. " तिनें जणुं हुकुम सोडला.

" कशाला ते? काय करणार आहेस तूं ते घेऊन? "

" कां बरं? माझ्या वडिलांनीं ते मला बक्षीस दिलेले आहेत. त्यांचे त्यांना मी ते देऊन टाकीन. "

"पण मग आतां ज्या ठिकाणीं ते गेले आहेत तीच जागा जास्त चांगली आहे. सांसारिक गरजांचे साजिंदे आणि दलाल होण्यापेक्षां भक्तगणांच्या सेवेला सत्कारणीं तरी ते लागतील!"

दामिनीच्या मनांत गुरुभक्तीचा उदय तिच्या इच्छेच्या विरुद्धही व्हावा यासाठीं जुलमाच्या मात्रेचे वळसे देण्याला ही अशा रीतीनें सुरुवात झाली. आणि मग प्रांपचिक मायामोहापासून तिचें मन परावृत्त व्हावें यासाठीं नानातऱ्हेचे आंगावर शहारे आणणारे मंत्रतंत्र, जादूटोणे यांचा मारे एक-सारखा मारा सुरू झाला.

अशा प्रकारें एकीकडे तिकडे तिचे वडील आणि धाकटा भाऊ हे खायला नाहीं, म्हणून खंगत चालले होते तर इकडे आपल्या घरीं रोजच्या रोज स्वतःच्या हातानें स्वयंपाक करून दामिनीला, आपल्या घरीं गुरुमहा-राजांबरोबर जमा झालेल्या साठ—सत्तर शिष्यवरांना पोटभर जेवायला घालावें लागत होतें. चिडून जाऊन तिनें पदार्थांमध्यें कधीं मीठच घालूं नये, तर कधीं जिन्नस करपवूनच ठेवावे; तरी पण तिच्या मागें हें जें तप-

श्रर्थेचें भूत लागलें होतें त्याच्यापासून सुटका होण्याला या तिच्या बंडखोरीचा एवढासुद्धां उपयोग झाला नाहीं.

अशा सुमारास शिवतोषबाबूंचा अंत झाला, पण मरतां मरतां त्यांनीं आपल्या पत्नीला, तिच्या गुरुभक्तीच्या अभावाच्या पापाबद्दल चांगलीच अद्दल घडेल अशा प्रायश्चित्ताची तजवीज करून ठेवली. सारी चीजवस्त त्यांनीं गुरुमहाराजांना देऊन टाकली आणि खुद्द पत्नीलाही त्यांनीं त्यांच्याच ताब्यांत सोंपविली. तिची सारी मालमत्ता आणि ती स्वतः यांचें पालनकर्तेपण त्यांनीं गुरुमहाराजाकडे दिलें.

७

भावोद्रेकाच्या नुसत्या लाटांवर लाटा उसळत होत्या. त्यामुळें घरामध्यें मारे दंगल माजून राहिली होती. गुरुमहाराजांच्या पायाशीं बसायला मिळावें या आशेनें चोहोंकडून प्रांतोप्रांतींच्या भक्तगणांची एकसारखी नुसती प्रचंड रीघ लागलेली होती. घरांत स्वतः दामिनीला गुरुमहाराजांच्या सेवेला सादर राहण्याची संधि स्वतः कसलाही प्रयत्न न करतां लाभली होती. पण आपल्या पायाशीं चालून आलेली ही भाग्यलक्ष्मी, दामिनी लाथाडून उन्मत्तपणें दूर ढकलीत होती.

तिच्यावरील आपला खास अनुग्रह व्यक्त करण्यासाठीं म्हणून गुरुमहाराजांनीं तिला एखादे वेळीं हाक मारली तर ? तर तिनें मुद्दामच कांहीं तरी डोकें दुखण्याची खोटीच सबब करून मुद्दाम त्यांच्याकडे येऊंच नये. स्वामीजींसाठीं करावयाच्या तिच्या कामामध्यें केव्हां कोठें कांहीं विशेष उणेपणा आढळला तर स्वामीजींना तिला बोलण्याचा प्रसंग यायचा. तर अशा प्रसंगीं आपण नाटकाला गेलों होतों म्हणून तें काम राहिलें असें ती बिनदिक्कतपणें कबूल करायची. त्या तिच्या सबबीमध्यें सत्याचा अंश जरी नसला तरी उद्धटपणाचा अंश मात्र तिच्यामध्यें भरपूर भरलेला असे.

दामिनीच्या एकंदर चालचलणुकीच्या प्रकारानें बाकीच्या शिष्यिणींना आश्चर्यानें वेडें व्हायची पाळीं यायची. प्रथम म्हणजे तिच्या पोशाखाची तऱ्हा. विधवा स्त्रियांनीं वापरूं नयेत असे कपडे ती खुशाल वापरावयाची. दुसरें म्हणजे गुरुमहाराजांच्या तोंडचें ज्ञानामृतपान प्राशन करण्याची तिला

मुळींसुद्धां उत्सुकता नसायची. बरें, एवढे मोठे गुरुमहाराज, त्यांच्या समक्ष थोडें आदबीनें आणि भक्तिभावनम्रतेनें वागावें; तर याही गोष्टीचा तिच्या ठिकाणीं मागमूससुद्धां नव्हता. बाकीच्या शिष्यिणी नेहमीं म्हणायच्या "काय बाई तरी तऱ्हा या बाईची.! आजवर पुष्कळ उठवळ दांडग्या पोरी आम्ही पाहिल्या. पण या दांडोबाच्यासारखा अगोचरपणा नाहीं बाई कधीं कुठें पाहिला!"

स्वामीजी आपले नुसते हंसायचे. ते म्हणत, "शूर शत्रूशीं लढा देण्यांत परमेश्वराला मोठी हौस वाटते. आपला पराभव झाला असें जेव्हां दामिनीला कबूल करण्याची पाळी येईल तेव्हा तिचें परमेश्वराचे ठिकाणचें आत्मार्पण निरतिशय संपूर्ण असें होईल.

तिच्या या उद्धटपणाबद्दल स्वामीजींनीं उलट अत्यंत असामान्य सहनशीलता दाखविण्याला सुरुवात केली. पण यामुळें दामिनीच्या मनाचा अधिकच भडका झाला. कारण ती ओळखत होती कीं आपल्याला शिक्षा करण्याचीच ही एक चांगली खोचदार पद्धति आहे. एक दिवशीं तर स्वामीजी आपल्याशीं किती विशेष, वाजवीहून अधिक, नाजूक, लाडिकपणानें, मनधरणीच्या वृत्तीनें वागतात याची ती आपल्या बरोबरीच्या स्त्रियांना नक्कल करून दाखवीत होती. आणि हंसून हंसून अगदीं तिची मुरकुंडी वळली होती. अशा ऐन रंगांत स्वामींच्या नजरेस ती पडली. पण रागाचा एक शब्द सुद्धां त्यांनीं उच्चारला नाहीं. उलट ते म्हणाले कीं "या अशा प्रकारामुळें तर या हिच्या जीवननाटकाचा अखेरचा प्रवेश अधिकच अलौकिक स्वरूपाचा होईल, यांत तिच्या बिचारीकडे काय दोष आहे.? त्या अखेरच्या प्रवेशाच्या सिद्धीसाठीं जर दैवच तिला तसें नाचवीत आहे, त्याला ती काय करणार?"

आम्हीं कलकत्त्याला आलों त्या वेळीं दामिनीचा प्रकार एकंदर हा असा होता. पण स्वामीजींनीं म्हटल्याप्रमाणें त्या प्रकाराचा शेवट खरोखरच मोठा अलौकिक झाला. याच्यापुढें आणखी कांहीं लिहिण्याला माझें मनच घेत नाहीं—शिवाय एकंदर बनावच असा कांहीं घडला कीं त्याचें शब्दांनीं वर्णन करणेंच कठिण आहे. या शरीररूपी किंवा बाह्य आचरणरूपी पडद्याच्या आंतील बाजूस जें दुःखाचें जाळें विणलें जात असतें त्याच्या

स्वरूपाची मांडणी किंवा आंखणी तुमच्या आमच्या धर्मग्रंथांमधील वचनांना अनुसरून होत नसते. किंवा आमच्या योजनेप्रमाणेंही त्याचें रंगरूप ठरत नसतें. त्यामुळें बाहेर जें माणसाचें वागणें चाललेलें असतें, अंतःरंगांत त्याची जी कांहीं घडण सुरू असते, त्यांच्यामध्यें आपल्याला पुष्कळदां फारच विरोध आढळून येतो. या विरोधामुळेंच अंतःकरणाला तीव्र जखमा होतात आणि डोळ्यांतून तीव्र शोकाश्रूंचे पूर वाहूं लागतात.

शेवटीं एक दिवस असा उजाडला कीं ज्या दिवशीं तें विरोधाचें कठिण बाह्य कवच पार फुटून त्याचे तुकडे तुकडे झाले आणि आंतमधील आत्मसमर्पणाचें पुष्प बाहेर पडून दवबिंदुपूर्ण असें आपलें मुख वर करून उभें राहिलें. दामिनी आतां सेवा अगदीं खऱ्या अंतःकरणानें करूं लागली. तिची ती निष्ठापूर्वक होणारी सेवा इतकी रम्य आणि मधुर होऊं लागली कीं ज्या देवाची आपण आजवर उपासना करीत आलों त्या देवाच्या कृपाप्रसादाचाच जणुं आपल्यावर वर्षाव होतो आहे असें सर्व शिष्यवृंदाला होऊन गेलें.

दामिनीच्या दृष्टीमधील सौदामिनीची चपलता नाहींशी होऊन ती जेव्हां स्थिरावून प्रशांत अशी प्रकाशूं लागली तेव्हां सतीशनें तिला पाहून निदान केलें कीं, दामिनी सुंदर आहे. पण हें मात्र सांगायला हवें कीं सतीशची दृष्टि खिळली ती तिच्या सौंदर्यगुणावर, दामिनी म्हणून कोणी स्त्री त्याच्या नजरेस आलीच नाहीं.

स्वामीजींची ध्यानस्थ मूर्ति चिनी मातीच्या पदकावर कोरलेली अशा प्रकारची एक तसबीर तयार केलेली होती. सतीशच्या खोलींत ती नेहमीं टांगलेली असे. एके दिवशीं तो पाहतो तों ती तसबीर जमिनीवर पडून तिचे तुकडे तुकडे झालेले. त्याला वाटलें कीं आपल्या लाडक्या मांजराचा हा प्रताप ! पण त्यानंतर अशा कित्येक चेष्टा होऊं लागल्या कीं, त्या मांजरानिंजराकडून होतील अशी कल्पनासुद्धां करणें शक्य राहिलें नाहीं. हवेंतच कांहीं तरी बिघाड झाल्यासारखा झाला आणि त्यामुळें मधून मधून कोठून तरी विजेचे धक्के बसल्यासारखे होऊं लागलें.

इतरांच्या मनांत काय चाललें होतें कोणास ठाऊक ? पण माझ्या हृदयाला मात्र तीव्र आणि वाढती वेदना रोज कुरतडून खाऊं लागल्यासारखें

मला होऊं लागलें. एकदां मला असें वाटे कीं हा सतत भावोद्रेकांचा ताण मी सोसतों आहे तो माझ्या आवांक्याबाहेरचा होत असावा मला. द्यावें हें सगळें सोडून आणि जावें दूर पळून तरच ठीक होईल असें मला वाटूं लागलें. पूर्वीं मी जो त्या चांभाराच्या मुलांना शिकविण्याचा उद्योग करीत होतों त्यांत हल्लींच्या सारखें कांहीं काव्यबिव्य बिलकूल नव्हतें हें खरें, पण आतां मला त्याचीच ओढ वाटूं लागली.

थंडीच्या दिवसांत दुपारच्या वेळीं एक दिवस स्वामीजी नित्याप्रमाणें वामकुक्षी करीत होते. शिष्यमंडळी पण श्रमल्यामुळें विश्रांतिसाठीं स्वस्थ पडली होती. अशा त्या अगदींच आड वेळीं कशासाठीं कोण जाणें, सतीश आपल्या खोलीकडे चालता झाला. पण त्याला दारांतच थांबावें लागलें. आंतमध्यें त्याच्यासमोर दामिनी होती. तिचे केस विसकटलेले होते आणि जमिनीवर लोळण घेऊन हुंदके देत देत ती आपले पाय जमिनीवर आपटीत होती. आणि त्या तिच्या हुंदक्यांतूनच "अहो, असे कसे अगदीं तुम्ही जणु दगड, नुसते काळे फत्तर; कांहीं तरी दया करा माझ्यावर; कृपा करा आणि मला ठार करून या जगांतून कायमची नाहींशी तरी करा ना! म्हणजे सुटेन तरी मी एकदांची!" असे उद्गार निघाले.

कशाची कांहीं सांगतां येईना पण सतीशच्या हृदयांत भीति भरली. पायापासून डोक्यापर्यंत त्याला कापरें भरलें; आणि तशाच अवस्थेंत दारांतून त्यानें दूर विरुद्ध दिशेला धूम ठोकली.

८

दरवर्षीं कोठें तरी दूर, जनसंमर्दापासून आड आणि दूर अशा अगदीं एकांत ठिकाणीं कांहीं काळ जाऊन राहावयाचें असा स्वामीजींचा नियम होता. अशा जागीं मुक्कामाला यंदां माघ महिन्याच्या सुमाराला जायचें असें ठरलें होतें. सेवेसाठीं सतीशनें त्यांच्याबरोबर राहावयाचें असाही बेत झाला होता.

मला पण बरोबर येऊं द्या असें मी म्हणालों. रोजच्या रोज चाललेल्या त्या विकारोद्रेकाच्या मजलशीची मला आतां इतकी कांहीं भयंकर शिसारी आली होती कीं कोठें तरी जाऊन जरा चांगले शारीरिक श्रम करावे

आणि मानसिक शांतता अनुभवावी यांची माझ्या स्वास्थ्याच्या दृष्टीनें मला फार जरूर वाटत होती.

स्वामीजींनीं दामिनीला बोलावून घेतलें. " बाई ग, " ते तिला म्हणाले, " मी आतां नित्याप्रमाणें बाहेर प्रवासाला जाणार आहें. तेव्हां दरम्यानच्या काळांत तुला मला सोडून राहयला हवें. तेव्हां नेहमींच्याप्रमाणें तुझी राहण्याची व्यवस्था तुझ्या चुलतीकडे ( मावशीकडे ) करावी म्हणतों मी. "

" पण मला तुमच्याबरोबर यायचें आहे " दामिनी म्हणाली.

" भलतंच. तुला तो त्रास मुळींच सहन होण्यासारखा नाहीं. आम्हां मंडळींचा प्रवास म्हणजे जिवाचें रान ! "

" मुळींच नाहीं. कांहीं सुद्धां त्रास नाहीं व्हावयाचा मला " तिनें उत्तर दिलें. "माझी तुम्ही मुळींच काळजी करूं नका. मला त्रास होईल असें मनांत सुद्धां आणूं नका. "

दामिनीचा आपल्यावरील भक्तीचा हा पुरावा पाहून लीलानंद महाराजांना आनंद वाटला. याच्यापूर्वीं स्वामीजींचे कलकत्त्याबाहेर प्रवासाला जाण्याचे दिवस म्हणजे दामिनीला मोठे सणाचे आणि सुटीचे दिवस वाटत असत. केव्हां एकदां ते दिवस येतात म्हणून ती वाट पाहात असायची. " केवढें आश्चर्य ! केवढा चमत्कार ! " स्वामीजी आपल्याशींच पुटपुटले " परमेश्वराच्या भक्तीच्या कढईत प्रत्यक्ष दगड सुद्धां कसा मेणासारखा मऊ होतो पहा. "

शेवटीं दामिनीनें आपलें म्हणणें खरें केलें आणि ती आमच्या बरोबर आली.

## ९

कित्येक तासपर्यंत उन्हांत रणरण करीत जमीन तुडविल्यावर आम्ही दर्याकांठीं एका लहानशा टेंकडीवर येऊन पोंचलों. या ठिकाणीं नारळीच्या झाडांची चांगली गर्द छाया होती. तेथील एकांत आणि निस्तब्धता तर फारच गाढ होती. टेंकडीच्या सभोंवार मेखलेप्रमाणें वेष्टन घालून पसरलेल्या समुद्राच्या लाटांचा स्वाभाविक असा खेळकर खळखळाट आणि त्याच्यामध्यें मिसळून जाऊन त्याच्याशींच एकरूप होणारा नारळीच्या झांपाचा

खुसखुस आवाज यांच्या मंद ध्वनीखेरीज त्या ठिकाणीं इतर कसलाच आवाज येत नव्हता. मग कर्कश आवाजाचें नांव कशाला! जणुं दमून भागून झोपेसाठीं लवंडलेल्या सागरतीराचा समुद्राच्या पाण्यावर झोंपेंतच शिथिल होऊन पडलेला हातच तो असावा असें त्या स्थानाचें स्वरूप दिसत होतें. त्या हाताच्या उघडया तळहातावर एक निळसर गर्द हिरव्या झाडीची लहानशी टेकडी उभी होती. आणि टेंकडीच्या आंतल्या आंगाला एक फार मोठी प्राचीन काळची कोरीव गुंफा—लेणें—होती. त्या लेण्याचें सौंदर्य खरोखरच मोठें गंभीर आणि प्रशांत होतें, आणि असें असूनही या कोरीव कामाचा काळ कोणता, तें कोणी केलें, त्याची रीति कोणती आणि त्यांत कोरलेल्या चित्रांचा विषय काय याबद्दल मात्र पुराणवस्तु—संशोधकांत मोठीच अशांतता त्यानें निर्माण केलेली होती.

त्या लेण्यांतील देवाचें दर्शन घेऊन मग आम्ही ज्या गांवीं मुक्काम केला होता तेथें परत यावें असा आमचा विचार होता. पण त्या ठिकाणीं पोंचल्यावर ही गोष्ट शक्य नाहीं असें आम्हांला दिसून आलें. दिवस आतां चांगलाच कलला होता. आणि रात्री तर काळोखाच्या होत्या. पूर्णिमा होऊन वर किती तरी दिवस, लोटलेले होते. तेव्हां ती रात्र या गुंफेंतच काढावी असें शेवटीं लीलानंद महाराजांनीं ठरविलें.

समुद्राच्या अगदीं काठाशीं किनारीप्रमाणें शोभणाऱ्या त्या नारळीच्या बनांत गर्द छायेमध्यें विश्रांतीसाठीं वाळूवरच आम्हीं चौघे बसलों होतों. तिकडे पश्चिम क्षितिजावर सायंकाळचा गुलाबी वर्ण हळूहळू जास्त जास्तच खालीं जात होता. जणुं कांहीं दिवस जातेसमयीं उगवत्या रजनीचा नम्रतापूर्वक निरोपच घेत होता.

अशा समयीं स्वामीजींनीं स्वकृत असें एक गीत खड्या सुरांत मोकळेपणें गायला सुरुवात केली. सुरुवातीच्या दोन ओळींमध्यें आशय असा होता

रस्त्यावरून परत फिरण्याच्या जागीं इतक्या दीर्घ अवधीनंतर आज आपली भेट होते आहे तोच हा दिवस अगदीं मावळावयाला आला आहे.

तरी पण या संधिप्रकाशांतच तुझें मुख निरखून पाहण्याचा प्रयत्न मी करते आहे तर इकडे दिवसाच्या प्रकाशाचा शेवटचा किरण मावळून रात्रींच्या अंधकारांत विलीन होतो आहे.

हें गीत आजपर्यंत आम्हीं पुष्कळदां ऐकलें होतें. परंतु गाणारा, ऐकणारे आणि सभोंवतालची परिस्थिति यांचा आजच्या इतका सुंदर आणि संपूर्ण मिलाफ आम्हीं कधींच पाहिला नव्हता. दामिनीचें तर हृदय उचंबळून येऊन तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. पुढचें कडवेंही स्वामींनीं तितक्याच उत्साहानें म्हणण्याला सुरुवात केली. त्या कडव्यांत म्हटलें होतें कीं,

तूं आणि माझी नजर यांच्यामध्यें असा हा अंधार आडवा येतो आहे म्हणून कांहीं मी मनाला लावून घेणार नाहीं;

पण फक्त एकच क्षण तूं माझ्यामोर उभा राहा; आणि मला तुझ्या पायांचें तेवढ्यांतच चुंबन घेऊं दे आणि त्यांच्यावरील धूळ माझ्या केसांनीं झाडूं दे; अधिक माझें कांहीं कांहीं मागणें नाहीं.

एखाद्या पूर्ण परिपक्व अशा सोनेरी फळांतून रस जसा ओथंबलेला दिसावा तसें, स्वामीजी म्हणायचे थांबले त्या वेळीं समुद्रांवर आणि वातावरणांत सर्वत्र गाढ पसरलेल्या प्रशांत संध्या रागामध्यें, त्यांच्या गायनांतील स्वरसंगमाचें उफाळणारें माधुर्य अगदीं अपरंपार ओथंबल्यासारखें होऊन गेलें.

दामिनी उठली आणि स्वामींच्यापाशीं गेली. तिनें त्यांच्या पायाशीं लोटांगण घातलें. त्या वेळीं तिचा केशभार मोकळा सुटला आणि त्याचे दोन भाग होऊन ते पायांच्या दोन्ही बाजूंस लोळूं लागले. किती वेळ तरी मान सुद्धां वर न करतां ती तशीच पडून होती.

## १०

[ सतीशच्या रोजनिशीमधून ]

त्या लेण्यामधील देवालयाला पुष्कळच दालनें होतीं. त्यांपैकीं एकामध्यें मी घोंगडी टाकून पडलों होतों. गुंफेमध्यें जिकडे तिकडे गडद अंधारच पसरलेला होता. हा अंधार जणुं एखाद्या भल्या थिप्पाड काळ्या कभिन्न शरीराच्या राक्षसासारखा कोणी खरोखरीचा जीवंत प्राणी आहे असा मला भास होत होता; आणि त्याच्या दमट श्वासोच्छ्वासांतून माझ्या आंगावर जणुं गार दंव पडल्यासारखें मला होत होतें. हळूं हळूं एका भयंकर

कल्पनेनें माझ्या मनाची पकड घ्यायला सुरुवात केली. मला वाटलें कीं सृष्टीमध्यें अगदीं प्रथम जो सजीव प्राणी जन्माला आला असेल तो हा या गुंफेतला अंधाररूपी राक्षसच असला पाहिजे. त्याला डोळे नव्हते, कान नव्हते. फक्त एक अत्यंत प्रचंड अशी क्षुधा तेवढी त्याच्या ठायीं होती. आधींच त्या बिचाऱ्याला बुद्धि नाहीं. आणि शिवाय या गुहेंत अनंत काळापासून आजवर या गुंफेमध्यें त्याला कोंडून घातलेलें; त्यामुळे त्याला ज्ञान असें कशाचेंच नव्हतें. पण बुद्धि नसली तरी त्याच्या ठिकाणीं जाणीव, संवेदना होती; आणि कांहीं वेळ तर अथांग दुःख झाल्याप्रमाणें तो त्या एकांत स्थळीं एकसारखा आपला रडत होता, शोक करीत होता.

श्रमामुळें माझ्या शरीराची शीर न शीर अगदीं भारावून दगडासारखी जाठली होती. तरी पण झोंप मात्र कांहीं केल्या येईना—कोठलेंसें एक पाखरूं बहुधा वटवाघूळ असावें तें—फडफड करीत बाहेरून आंत तरी येई किंवा आंतून बाहेर तरी जाई. त्याच्या पंखाचा, हवेमध्यें होणारा तो फडफडाटाचा आवाज फार कर्कश वाटत होता; आणि त्यामुळें वाऱ्याची झुळूक जी माझ्या आंगावर येई तिच्यामुळें अशी हुडहुडी भरे कीं अगदीं दांतखिळी वाजण्याचा प्रसंग.

शेवटीं वाटलें कीं बाहेरच जाऊन कोठें तरी झोप आली तर पाहावें. पण बाहेर जायला दार कोठल्या बाजूला आहे हें कांहीं मला नीटपणें आठवेना. अमुक एका बाजूला दार आहे अशा समजुतीनें मी हातपाय टेकीत रांगत रांगत आणि चांचपीत चांचपीतच त्या बाजूला जात होतों—तों अखेर एका भिंतीवरच जाऊन आदळलों. मग दुसऱ्या बाजूला जाऊं लागलों तों एका ठिकाणीं एका खळग्यांत खडकाच्या कपारींतून थेंब थेंब झरून पाणी सांठलें होतें त्या पाण्यांतच जवळ जवळ मी जाऊन पडलों.

तेव्हां मग परत आपला खुरडत खुरडत घोंगडीपाशींच आलों आणि तेथेंच पुन्हां लवंडलों. पण त्या ठिकाणीं पुन्हां असा भास होऊं लागला कीं त्या भयाण राक्षसाच्या पंजांतच जाऊन मी सांपडलों आहें आणि किती धडपड केली तरी त्याच्या पकडींतून कांहीं सुटून जातां येत नाहीं. भुकेनें अगदीं खवळलेल्या एका लांडग्याच्या तोंडींच मी सांपडलों आहेसें मला वाटूं लागलें. तो मला आपल्या जिभेनें चाटतो आहे

आणि चाटतांना त्याच्या तोंडांतली ओंगळ लाळ माझ्या आंगावर गळत आहे असाही मला भास होऊं लागला. हा प्राणी असा असाच चोखीत चाटीत मला खाऊन टाकणार आणि हळुहळु पोटांत रिचवून पचवून टाकणार; पण ही वार्ता या कानाची त्या कानाला सुद्धां कोठें कोणाला समजणार नाहीं, अशी चमत्कारिक भीति मला घेरूं लागली.

आतां झोंप आली तरच या त्रासामधून सुटका होणार हें मला उघड दिसत होतें. त्या भयंकर अंधकारमय एकांताची मगरमिठी जागेपणीं, जिवंतपणीं, मला बिलकूल सहन करण्यासारखी नव्हती. खरोखर मृत जीवांना शासन म्हणूनच हा असला एकांत परमेश्वरानें निर्माण केला असला पाहिजे. शेवटीं मला केव्हां आणि किती वेळानें झोंप लागली कोण जाणें आणि लागलीशी वाटली ती तरी खरीखुरी झोंपच होती कीं नाहीं कोणास ठाऊक; पण अखेरीस थोडीशी गुंगी सगळ्या शरिरावर पसरल्यासारखी झाली एवढें खरें. अशा त्या अर्धवट गुंगलेल्या अवस्थेंत असतांनाच माझ्या पावलाच्या जवळपास कोणाचा तरी दीर्घश्वास चालू आहे असा मला भास झाला. माझ्या कल्पनेनें उभ्या केलेल्या त्या जीवसृष्टीच्या सुरुवातीच्या प्राण्याचा, त्या अंधार राक्षसाचा तर हा श्वास नव्हे ना अशीही एक शंका खरोखर मला येऊन गेली.

नंतर मग कांहीं माझ्या पायाला बिलगलेंसें मला वाटलें. हा कांहीं तो कल्पना राक्षस खास नव्हता; तर कोणी तरी खास रानटी वन्य पशूच तो आहेसें वाटलें ! पण तसें म्हणावें तर त्याच्या त्या स्पर्शांत केसाळ राठपणाचा कोठें अंश सुद्धां अनुभवाला येत नव्हता. तर मग एखाद्या नव्याच जातीचा, तो साप किंवा सरपटणारा प्राणी तर नव्हता ना, कीं ज्याचें रंगरूप मी कधीं पाहिलेलेंही नव्हतें किंवा आपलें भक्ष्य चट्ट करण्याची ज्याची पद्धतीही मला माहीत नव्हती. त्यामुळें त्या स्पर्शाचा मृदुपणा मला अधिकच आंगावर शहारे आणणारा आणि नकोसा वाटला—कारण कोणाला ठाऊक, निवळ खाणें हाच ज्याच्या शरीराचा केवळ धर्म अशा कोठल्या अज्ञान आणि भयंकर अशा प्राण्याचा स्पर्श तो होता तें !

एका बाजूला धास्ती आणि दुसऱ्या बाजूला किळस यांच्या कचाटयांत माझ्या तोंडांतून आवाजही फुटेना. पाय हिसडून लाथाडून लाथाडून त्या

प्राण्याला दूर करण्याचा प्रयत्न मी केला; पण व्यर्थ. पायांतहि तसा जोरच येईना त्यामुळें त्याचें तोंड आपलें माझ्या पायांना बिलगल्यासारखेंच राहिलें आणि त्याच्या धांपाचा मारा माझ्या पायावर होतच राहिला. त्याचें तोंड असेल तरी कसें, कांहीं कल्पनाच होईना मला. शेवटीं माझी गुंगी नाहींशी होऊन चांगला भानावर जेव्हां मी आलों तेव्हां मात्र मी एक चांगलीच जोराची लाथ झाडली. प्रथम माझी अशी समजूत झाली होती कीं त्या प्राण्याच्या ठिकाणीं केसाळपणाचा कांहीं भाग नाहीं म्हणून. पण आतां तर दाट आयाळासारखें कांहीं तरी माझ्या पायांना घासून गेलें. धडपडतच मी बसला झालों

अंधारांतून कांहीं तरी निघून गेलें. जातां जातां कांहीं तरी अत्यंत चमत्कारिक असा आवाजही झाला. रडण्याचा आणि हुंदक्यांचा तर तो आवाज नव्हता ?

## प्रकरण तिसरें : : दामिनी

आतां परत आम्हीं आमच्या त्या खेडेगांवांतील मुक्कामाच्या ठिकाणीं आलों आहों. आमच्या मुक्कामासाटीं स्वामीजींच्या एका भक्ताच्या मालकीचें दुमजली घर दिलेलें आहे. शेजारींच गांवचें देउळ आहे. आमच्या मंडळाच्या खाण्यापिण्याच्या वगैरे सर्व व्यवस्थेची सगळी कामगिरी अजून दामिनीकडेच आहे. असें असूनही ती जवळ जवळ आमच्या नजरेसच पडत नाहींशी झाली आहे. अलीकडे शेजारपाजारच्या आयाबायांमध्यें तिनें बऱ्याच ओळखी पाळखी संपादन केलेल्या होत्या. त्यांना बरोबर घेऊन आज या बाईच्या घरीं तर उद्यां दुसरीच्या अशा रीतीनें ती आपला बहुतेक वेळ बाहेरच काढीत असते.

यामुळें स्वामीजींची मर्जी कांहीं विशेषशी प्रसन्न दिसत नाहीं. त्यांना असें दिसून आलेलें आहे कीं स्वर्गाच्या उच्च वातावरणाकडे, ब्रह्मविद्येच्या उत्तुंग तेजभूमीकडे दामिनीचें हृदय अद्यापिही आकृष्ट होऊं शकत नाहीं. तिला अजून या पृथ्वीवरील जड घरादारांचेंच सगळें वेड आहे. शिष्यमंड-

ळीची रोजची खाण्यापिण्याची वगैरे व्यवस्था पाहण्याचें काम अलीकडे अलीकडे ती जी अगदीं भक्तिभावपूर्वक देवपूजेचाच एक भाग अशा भावनेनें करूं लागली होती, त्या कामामध्येंही आतां तिला एक प्रकारचा कंटाळा आल्याचें चिन्ह दिसूं लागलें होतें. तिच्या हातून अलीकडे कित्येकदां चुका होऊं लागल्या होत्या. तिच्या सेवेंत पूर्वीचा तो उल्हास शिल्लक राहिलेला नव्हता. सेवेंतील तेज, गोडवेपणा नाहींसा झालेला होता.

विशेष म्हणजे मनामध्यें अलीकडे स्वामी महाराजांना तिचें एक प्रकारचें भय वाटूं लागल्यासारखें झालें होतें. तिच्या कपाळावर अलीकडे तिरस्काराच्या आठ्यांचे दाट कृष्णमेघ जमूं लागलेले होते; तिचा वृत्तिसागर अलीकडे चंचल वायुलहरींच्या झपाट्यानें पुनःपुन्हा क्षुब्ध होऊं लागला होता. तिचा केशकलाप मैल होऊन तिच्या मानेवर जलभारानें भारावलेल्या मेघाप्रमाणें खालीं उतरूं लागला होता. तिचे घट्ट दाबून धरलेले ओंठ, तिच्या डोळयांच्या कोपऱ्यांतून विजेप्रमाणें चमकणारे कटाक्ष, आणि तिच्या वागण्यांत—चालचलणुकींत एकाएकीं आलेला स्वच्छंदी अनिश्चितपणा—हीं सर्व होऊं घातलेल्या बंडाच्या तुफानाचींच पूर्वचिन्हें होतीं.

म्हणूनच कीं काय स्वामीजींनीं आपल्या भजनकीर्तनाचा जोष पुन्हां नेटानें सुरू केला. बाहेर भटकणारी ही मधमाशी या भजनपुष्पाच्या सुगंधानें मोहून परत आली म्हणजे आंतील भावमधूचें आकंठ पान करण्यामध्यें ती पुन्हां गुंग होऊन जाईल अशी त्यांना आशा वाटत होती. आणि म्हणून हिवाळयामधील ते लहान दिवस अत्यंत भावमधुर अशा भजनांच्या मादक मद्याच्या फेसानें दशादिशांनीं जणुं उतूं जाऊं लागले, आमच्या मुक्कामाच्या ठिकाणीं.

पण छे ! दामिनी कांहीं या जाळयांत सांपडेना. त्यामुळें खिजल्यासारखे होऊन स्वामीजी मोठ्यानें हंसून म्हणाले, कांहीं हरकत नाहीं. स्वतः जगस्वामीच शिकारीवर निघालेला आहे. हरिणी मोठ्या निश्चयानें आणि आवेशानें पळून जाण्याचा यत्न करते आहे खरी. पण त्यामुळें तर शिकारीच्या आकर्षकपणांत, रसांत अधिकच बहार येते आहे. पण कांहीं झालें तरी अखेरीला हरिणी शिकाऱ्याच्या तावडींत सांपडणारच; त्यांतून तिची सुटका नाहीं.

अगदीं प्रथम जेव्हां दामिनीची आमची ओळख झाली तेव्हां स्वामीजींच्या भोंवतालच्या भक्तगणाच्या घोळक्यामध्यें कांहीं ती कधीं नसे. पण त्या वेळेला याचें आम्हाला कांहीं विशेष वाटलें नाहीं. पण आतां तिची गैरहजिरी आम्हांला विशेषच लक्षांत येऊं लागली होती. ती वारंवार गैरहजर राहूं लागली होती; आणि त्यामुळें आमच्या येथें वादळें माजून राहूं लागलीं होतीं.

तिच्या ठिकाणच्या अहंकार बुद्धीचा हा दोष असें स्वामीजींना वाटे; पण त्यामुळें त्यांच्या स्वतःची अहंकारबुद्धि जागृत होऊन त्यांना आपला अपमान झालासें वाटे. कोणी म्हणेल मला काय वाटत होतें दामिनीच्या या वागण्याबद्दल? पण मला काय वाटत होतें याची फिकीर तरी आहे कोणाला, मी मनाशीं म्हणत असें.

एक दिवस मोठा हिय्या करून स्वामीजी स्वतःच्या अत्यंत मधुरतम स्वरांत दामिनीला म्हणाले, " दामिनी, बाळ, आज दुपारीं तुला थोडा वेळ होईल का ? झाला तर—"

" नाहीं व्हायचा " दामिनीनें उत्तर केलें.

" कां नाहीं व्हायचा ? कांहीं हरकत नाहीं ना सांगायला ? "

" नंदींच्या घरीं मला कांहीं फराळाचे जिन्नस करायला जायचें आहे. "

" फराळाचे जिन्नस ? कशासाठीं बरं ? "

" त्यांच्याकडे लौकरच लग्न आहे. "

" पण त्यासाठीं तूं नाहीं गेलीस तर अगदीं अडून..."

" येईन म्हणून मी त्यांना कबूल केलें आहे. "

येवढें बोलून आणखी कसल्या प्रश्नाची वाट न पाहतां दामिनी झटकाऱ्यानें तेथून चालती झाली.

सतीश येथेंच आमच्यापाशीं बसलेला होता. हें पाहून तो तर आश्चर्यानें मूढ होऊन गेला. किती विद्वान्, किती धनवान, कीर्तिमान अशा असंख्य लोकांनीं स्वामीजींच्या पायाचा आश्रय आजवर घेतलेला होता. आणि ही तर एवढीशी चिमुरडी पोर तिच्या ठिकाणीं एवढा हा आत्मविश्वास आणि धीटपणा आला तरी कोठून या प्रश्नाचें कोडें सतीशला कांहीं केल्या सुटेना.

पुढें एके दिवशीं दामिनी संध्याकाळीं घरींच होती. स्वामीजींनीं त्या दिवशीं निरूपणासाठीं कांहीं विशेष महत्त्वाचा विषय निवडला होता. कांहीं वेळ प्रवचन झाल्यावर आमच्या चेहऱ्यावर त्याना कांहीं तरी दिसून आलें आणि त्यांनीं निरूपण जरा थांबविलें. प्रवचनाकडे आमचें मुळीं लक्ष नाहीं हें त्यांना दिसून आलें. कां बरें असें म्हणून त्यांनीं जरा आजूबाजूला नजर टाकली तों त्यांना समजून आलें त्या ठिकाणीं दामिनी कांहीं दिसत नव्हती. ती आपली आंतल्या खोलींत कांहीं शिवण घेऊन बसली होती तिकडेच अजून होती. दामिनी प्रवचनाच्या ठिकाणीं आपल्या जागेवर नाहीं, ती आलेली नाहीं--ती नाहीं हेंच पालुपद जणुं आतां त्यांच्या डोक्यामध्यें सारखें घुमूं लागून त्यांना त्रस्त झाल्यासारखें झालें. त्यांचें निरूपणामधील विषयाचें सूत्र सुटूं लागलें आणि शेवटीं त्यांनीं प्रवचनाला मध्येंच रामराम ठोकला.

प्रवचनाच्या दालनामधून निघून स्वामीजी दामिनीच्या खोलीच्या दाराशीं गेले. तिला हाक मारून ते म्हणाले, "दामिनी इथें आंत तूं अगदीं एकटीच बसून काय करते आहेस? बाहेर आमचा कार्यक्रम चालला आहे तिथें येऊन बैस ना!"

"मी कामात आहें" दामिनीनें उत्तर दिलें.

अशा रीतीनें अपेशी होऊन स्वामीजी परत येऊं लागले तों किलकिल्या दाराच्या फटीमधून आंत दामिनी काय करीत आहे हें त्यांच्या नजरेस आलें. तिच्यापुढें पिंजऱ्यामध्यें बंद केलेली अशी एक घार होती. कशी कोण जाणे पण विजेच्या तारेला तिची धडकी लागली होती. आणि त्यामुळें खालीं पडून ती जखमी झाली होती. कावळे तिला नुसते टोचून खात होते. इतक्यांत दामिनीनें तिला सोडविलें. आणि तेव्हांपासून तिची शुश्रूषा करण्यांत ती गुंतलेली होती.

पण ही घारच तेवढी दामिनीच्या काळजीचा विषय त्या ठिकाणीं होऊन राहिली होती असें नव्हे. घारीच्या जोडीला त्या ठिकाणीं एक घाणेरडें कुत्र्याचें पिलूं पण होतें. हें पिलूं म्हणजे जणूं एखाद्या त्रस्त समंधाचा प्रत्यक्ष अवतार होय. आमच्या झांजा चिपळ्यांचा आवाज कानावर आला रे आला कीं त्यानें तोंड वर आभाळाकडे करून रड्याचा लांबच लांब कर्कश सूर काढून तक्रार सुरू करावयाची. स्वर्गामधील देव

बेटे आमच्यापेक्षां दैववान. म्हणून त्यांच्याशीं या तक्रारीकडे लक्ष देण्याची किंवा ती ऐकण्याची सुद्धां पीडा नव्हती. आम्ही पडलों गरीब मृत्यु-लोकांतलीं माणसें! आमच्या कानांत त्या किंकाळ्या कोठून शिरल्याशिवाय राहणार? आमचे कान त्यामुळें फुटायची वेळ आली होती.

दामिनीनें फुटक्या तुटक्या भांड्यांमध्यें कांहीं फुलझाडें लावलेलीं होतीं. आणि तीं ठेवलीं होतीं घराच्या गच्चीच्या छप्परावर. त्यांना पाणीबिणी घालून त्यांची निगा पाहण्यासाठीं म्हणून एक दिवस तिसऱ्या प्रहरीं दामिनीनें पार जणुं माळिणींचा अवतार धारण केलेला होता. अशा वेळीं सतीश तेथें गेला आणि त्यानें तिला अगदीं रोखठोक प्रश्न टाकला, " अलीकडे तिकडे यायचें तूं अगदींच कां टाकून दिलें आहेस? "

" तिकडे? कुणीकडे? "

" स्वामीजींच्या पायाशीं. "

" म्हणजे? तुम्हां मंडळींचें माझ्याशीं काय तिथें काम आहे? "

" आमचें काम कांहीं नाहीं. पण खरें काम, खरी जरूर तुझी स्वतःची आहे. "

" मुळींच नाहीं " दामिनी उसळून म्हणाली, " अगदी मुळींच नाहीं. मला कांहींची सुद्धां कसली जरूर नाहीं. "

तिचा तो आवेश पाहून सतीश जरा चमकून मागें झाला आणि कांहीं न बोलतां तिच्याकडे नुसता पाहातच राहिला. कांहीं वेळांत तिला ऐकूं जाईल अशा बेतानें आपल्याशींच पुटपुटला, " तुझ्या मनाला शांति प्राप्त झालेली नाहीं. ही शांति जर तूं मिळविलीस,—"

" शांति—आणि ती तुमच्यासारख्यापासून मिळणार? रात्रंदिवस तुम्हीं या साऱ्या धांगडधिंग्यांत दंग असता. ते तुम्ही मला शांति कोठली आणून देणार? तुमच्याजवळ शांति आहेच कुठें मुळीं? म्हणून माझी हातींपायीं पडून तुम्हाला एकच प्रार्थना आहे कीं माझ्या वाटेस तुम्हीं जाऊं नका. मी चांगली शांतिच उपभोगतें आहे. आणि तशीच ती उपभोगत राहायची माझी इच्छा आहे. "

" आमच्याकडे तूं नुसती वरवर पाहतेस. त्यामुळें वरच्या लाटा तेवढ्या तुला दिसतात. उतावीळपणा सोडून देऊन अचंचल चित्तानें तूं जरा खोल

आंतल्या बाजूला बुडी मारून पाहशील तर त्या ठिकाणीं किती गाढ शांतता नांदते आहे हें तुला चांगलें दिसून येईल. ”

हात चोळीत चोळीत दामिनी ओरडूनच म्हणाली, “ परमेश्वराशपथ मला तुमच्याजवळ माझे पदर पसरून हेंच मागायचें आहे कीं तुमच्या त्या समुद्रांत खोल बुडी घेण्याचा आग्रह तुम्हीं मला करूं नका. माझ्या मतांतराची आशा तेवढी जर तुम्ही अजीबात सोडून दिलीत तर या जगांत अजून चार दिवस मला जगायला मिळेल. ”

## २

स्त्री–हृदयाचीं गूढ कोडीं उलगडण्याइतका कांहीं जीवनाचा विस्तृत अनुभव मला कधींच आलेला नाहीं. मी जें कांहीं पाहिलें आहे तें सारें दुरून आणि बाहेरून ! तेवढ्यावरूनच मात्र माझें मत असें झालें आहे कीं ज्या ठिकाणीं दुःखाशिवाय दुसरें कांहींच वाट्याला यायचें नाहीं अशा ठिकाणींच आपलें हृदयसर्वस्व अर्पण करण्याची स्त्रियांची सदैव तयारी असते. आपल्या पसंतीची माळ त्या अशा एखाद्या नरपशूच्या तरी गळ्यांत घालतील कीं जो ती नेमकी आपल्या पायाखालीं तुडवील आणि आपल्या विषयतृष्णेच्या चिखलांत ती घाणेरडी करून टाकील; दुसरे पक्षीं त्या आपली पसंतीची माळ एखाद्या निव्वळ कल्पनांच्या मृग-जळामागें धावणाराच्या गळ्यांत तरी घालतील; पण स्वाभाविकच मग ती त्याच्या गळ्यांत टिकून राहूं शकणार नाहीं. कारण त्यानें आपल्या कल्पनाजालांतून उत्पन्न केलेलीं स्वप्नें जितकीं हवेवर विरून जाणारीं तितकीच हवेवर विरण्याइतकी त्याची मान कृश किंवा निःसत्त्व झालेली असल्यामुळें तिच्यावर ती माळा तग कशी धरणार ?

स्त्रियांना आपला पति किंवा प्रियकर निवडण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असलें तर ज्याच्यामध्यें चांगलें आणि वाईट या दोहोंचें मिश्रण आहे, जो स्त्रीला स्त्री समजूनच वागणारा आहे–म्हणजे काय, तर जो तिला आपल्या फुरसतीच्या वेळीं करमणूक करण्यासाठीं हातानं घेतलेली चिनीमातीची एक निव्वळ बाहुली असें मानणार नाहीं किंवा आपल्या कसबी हातांचा स्पर्श करतांच जिच्यामधून स्वर्गीय ध्वनि माधुर्य–स्रवूं लागणार अशी

कोणी अपूर्व अप्सरा समजत नाहीं, अशा एखाद्या माझ्यासारख्या सामान्य व्यवहारी माणसाची निवड कधीं म्हणून करावयाच्या नाहींत. त्या आपल्या आम्हांला नकारच देणार. आमच्याजवळ जबरदस्त असा वैषयिक मोहपाशही नाहीं, किंवा कल्पनेचें गुलाबी इंद्रजालही नाहीं. आमच्या विषयलालसेच्या चक्रावर घालून त्यांचा चक्काचूर करण्याचेंही सामर्थ्य आमच्याजवळ नाहीं. किंवा आमच्या ध्येयात्मकतेच्या साच्यांत ओतण्यासाठीं भावनोत्कटतेच्या ज्वालांनीं वितळवून त्यांचा रस करण्याचीही शक्ति आमच्या ठिकाणीं नाहीं.

स्त्रिया खरोखर जशा असतात तशाच स्वरूपांत आम्ही मंडळी त्यांना ओळखत असतों. त्यामुळें त्या आमच्याशीं स्नेहभावानें वागतील, पण आमच्यावर प्रेम करणार नाहींत. गरज पडली तर विश्वासानें त्या आमचाच आसरा घेतील. कारण त्यांच्यावरील आमच्या भक्तीची त्यांना पक्की खात्री असते; पण आम्ही आपलें आत्मदान त्यांना इतकें सहजासहजीं केलेलें असतें कीं त्यालाही कांहीं किंमत, मोबदला दिला पाहिजे ही गोष्ट त्यांच्या ध्यानींमनींही येत नाहीं. तेव्हां या आत्मदानाचा आमच्यासारख्यांना मिळणारा मोबदला म्हणजे काय तर त्यांच्या कामांत त्यांना उपयोगी पडणें हाच; क्वचित् एखाद्या ठिकाणीं आमच्यासारख्याबद्दल त्यांच्या मनांत थोडासा आदरभाव उत्पन्न होईल हा आणखी एक आम्हांला मिळणारा मोबदला. पण जाऊं द्या. मी जे हे मानसशास्त्रीय सिद्धांत मांडतों आहे तें खरोखर म्हणजे माझ्या वैयक्तिक तक्रारींचें, मनोव्यथेचेंच एक रूप असण्याचा संभव आहे. खरी गोष्ट अशी असण्याचा संभव आहे कीं अशा रीतीनें आम्ही जें कांहीं गमावतोसें वाटतें त्यांतच आमचें खरें हित असतें—निदानपक्षीं मनाचें सांत्वन करायला तरी ही भूमिका चांगली उपयोगी आहे.

दामिनीला स्वामीजी अगदीं नकोसे. म्हणून त्यांच्यासमोर सुद्धां यायचें ती टाळते. सतीशबद्दलची तिची अंतःकरणाची ओढ याहून अगदीं विरुद्ध टोकाची होती. पण म्हणूनच ती त्याच्याजवळ येण्याला कचरते. राहतां राहिलों त्या ठिकाणीं तिच्या जोडीला मीच काय तो एकटा असा, कीं ज्याच्याबद्दल प्रेम किंवा द्वेष या भावनांचा तिच्या अंतःकरणांत प्रश्नच

नव्हता. म्हणून मी जवळ असलों की पूर्वीचा काळ आणि हल्लींचा काळ, किंवा शेजारीपाजारी घडणाऱ्या रोजच्या हकिकती अशापैकीं कांहीं तरी किरकोळ महत्त्वाच्या गोष्टी काढून दामिनी मजजवळ चांगली अघळ पघळ बोलत बसावयाची. छपरावरील गच्चीमध्यें एक थोडासा आच्छादित भाग होता; दुसऱ्या मजल्यावर आमच्या ज्या वेगवेगळया खोल्या होत्या त्यांमध्यें जाण्यायेण्याची वाट गच्चीच्या या भागांतूनच होती. त्या ठिकाणीं दामिनी सुपारी कातरीत बसायची आणि तिथें मग आमच्या या गप्पा नेहमीं चालायच्या.

पण मला कळेना हें कीं भक्तिभावाच्या मेघांनीं गडद भरून गेलेल्या सतीशच्या नजरेंत आमचीं हीं सटरफटर बोलणीं कां आणि कशीं भरलीं ? क्षणभर असं जरी कबूल केलं कीं ही घटना कांहीं उगीच अशी तशी किरकोळ स्वरूपाची नव्हती, तरी पण सतीशला तिचें काय ? सतीश ज्या जगामध्यें रममाण झालेला होता त्या जगांत कसल्या घटना किंवा कसले प्रसंग अशी कांहीं क्षोभकारक वस्तूच मुळीं नव्हती ! अशी ना खरोखर स्थिति होती ? हा संसार म्हणजे सतीशच्या तात्त्विक श्रद्धेप्रमाणें पाहतां एक अनंत व अनादि असें नाटक होतें. दिक्कालांनीं मर्यादित अशा कोठल्या तुटक प्रसंगांचा त्यांत प्रश्नच नव्हता. सर्वकालव्यापी अविच्छिन्न असें परमेश्वराचें हें अद्वैत रूप होतें. परमेश्वरी सायुज्यतेच्या या नंदनवनामध्यें अखंड वाहत असलेल्या या यमुनेच्या—चैतन्य—सरितेच्या कांठीं झुळझुळ वाहणाऱ्या मंद मरुतांनीं वाहून आणलेला तो अमर मुरलीरव ऐकून ज्यांचीं अंतःकरणें भारून गेलेलीं आहेत त्यांना आपल्या आसपास चालणाऱ्या क्षणभंगुर गोष्टी अशा अवस्थेंत दिसत असतील अथवा ऐकूं येत असतील ही सुद्धां संभवनीय गोष्ट नाहीं. आणि ही तात्त्विक भूमिका समजण्याजोगी असो वा नसो, एक गोष्ट खरी होती कीं त्या लेण्यांच्या गुंफेतून त्या खेडेगांवीं आम्ही परत मुक्कामाला आलों त्याच्या पूर्वीच्या काळामध्यें सतीशची व्यावहारिक गोष्टीवरची नजर हल्लींच्याहून पुष्कळच मद्द असे.

हा जो त्याच्या नजरेंत अलीकडे फरक झाला आहे त्याला कांहीं अंशीं मीच कारण असलों पाहिजे. मी पण अलीकडे स्वामीजींच्या भजन—कीर्तनांना आणि

निरूपणांना मधून मधून गैरहजर राहूं लागलों होतों. आणि लौकरच हें असें इतकें वारंवार होऊं लागलें कीं व्यवहाराविषयीं अंधदृष्टी असणाऱ्या सतीशाच्यासुद्धां तें लक्षांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. म्हणून एक दिवस तो चौकशी करण्यासाठीं म्हणून आला. आणि त्याला आढळून आलें कीं, मी हातांत दुधाचें भांडें घेतलेलें आहे, गांवच्या गवळ्याकडून मुद्दाम त्यामध्यें मी दूध पैदा केलें आहे, आणि दामिनीनें नुकतेंच जें एक मुंगुस मिळवून पाळलें होतें त्याला त्या दुधाचें आमिष दाखवून पकडण्यासाठीं त्याच्या पाठीमागें मी धांवतों आहें. अर्थात् भजनाच्या बैठकीला न जाण्याचें कारण म्हणून सांगायला हा उद्योग अगदींच निरुपयोगी होता. भजनाहून उठल्यानंतर हा उद्योग केला असता तर कांहीं कोठें बिघडण्यासारखें किंवा अडण्यासारखें नव्हतें. आणि तसेंच पाहिलें तर त्या मुंगसाला काय वाटेल तें करीत बसायला किंवा नाचायला मोकळें सोडणें ही गोष्ट खरोखर सर्वांत उत्तम झाली असती. एका दगडानें दोन पक्षी मारावे तशासारखें त्या मुंगसाला मोकळें सोडण्यानें आमच्या पंथांतील दोन मुख्य तत्त्वांवर सर्वभूतीं दया आणि परमेश्वरावरील एकांतिक भक्ती या दोन तत्त्वांवर माझी श्रद्धा आहे हें स्पष्ट झालें असतें.

सतीश माझ्यापाशीं आला तेव्हां या कारणांमुळें सहजच मला शरम वाटलीसें दाखविणें भाग झालें. तें दुधाचें भांडें मी जागच्या जागींच ताबडतोब खालीं ठेवलें आणि ज्या ठिकाणीं गेलों असतां गेलेली अब्रू परत मिळण्याचा संभव होता त्या बाजूला जाण्यासाठीं निसटण्याचा प्रयत्न करूं लागलों.

पण दामिनीच्या वागण्यामुळें मात्र मी अगदींच चकित होऊन गेलों. लाजेची किंवा शरमेची एवढी रेषासुद्धां तोंडावर न दाखवितां ती आपली मला विचारते, "कां श्रीविलासबाबू ? कुणीकडे निघाली स्वारी ?"

डोकें खाजवीत खाजवीत तोंडांतल्या तोंडांतच मी म्हणालों—"नाहीं म्हटलं तिकडे मंडळीकडे—"

"इश्श. एव्हांना त्यांचं सगळं आटोपलं सुद्धां असेल. बसा झालं आतां."

दामिनीच्या तोंडून आणि सतीशच्या देखत हें वाक्य ऐकून माझा चेहरा गोरामोराच होऊन गेला.

मग सतीशकडे वळून दामिनी म्हणते, " या मुंगसानें कीं नाहीं नुसता उच्छाद आणला आहे पहा मला. काल रात्रीं आपलें त्यानें शेजारच्या मुसलमान वस्तीमधून एक कोंबडचिें पिलूंच पळवून आणलें. म्हणून त्याला आतां कांहीं बाहेर सोडायची सोयच राहिली नाहीं. त्याला डांबून ठेवायसाठीं एक चांगला भला मोठा करंडा आणून द्यायचं कबूल केलं आहे मला श्रीविलासबाबूंनीं."

तिच्यावर माझी किती भक्ति होती हीच गोष्ट मला वाटतें त्या मुंगसाचें निमित्त करून दामिनीला व्यक्त करायची होती. सतीशची आपल्या ठिकाणीं निष्ठा आहे असें दाखविण्यासाठीं स्वामीजींनीं त्या दिवशीं कशी हुकुमबाजी चालविली होती त्याची मला यावरून आठवण झाली. तो प्रकार आणि आजचा हा प्रकार दोहोंची जात एकच.

सतीशनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. आणि बोलणें अर्धवट टाकून तो तडक तेथुन चालता झाला. दामिनीकडे मी निरखून पाहूं लागलों तों सतीशच्या दूरदूर जाणाऱ्या आणि दिसत नाहींशा होणाऱ्या मूर्तीच्या पाठीमागून धांवणाऱ्या तिच्या दृष्टींतून जणुं स्फुल्लिंग बाहेर पडत आहेतसें मला वाटलें आणि तिच्या ओंठांच्या ठिकाणीं असें कांहीं उग्र आणि अति गूढ हास्य दिसून आलें कीं तिच्या मनांत काय चाललें असावें याचा त्यावरून कांहींच बोध होईना.

या प्रकारानंतर दामिनीनें आपल्या मनाशीं काय धोरण ठरविलें होतें, कोणास ठाऊक. मला जो परिणाम दिसून आला तो हा कीं आतां वाटेल तें शुष्क आणि पोकळ निमित्त करून दामिनी मला बोलावून घेऊं लागली. कधीं कधीं तिनें कांहीं सुंदर खायला करावें आणि मला खूप आग्रह करावा.

एक दिवस शेवटीं मला राहवेना. मी तिला विचारलें, " सतीशलाही बोलावून माझ्याबरोबर खायला बसविलें तर ?"

" कांहीं नको; त्यांना त्यामुळें त्रास होईल." दामिनीनें उत्तर केलें.

आणि योगायोग असा कीं सतीश त्याच बाजूनें कोठेंसा जात होता.

आणि अशी ही चमचमीत मेजवानी मला चाललेली असतांना नेमकें त्यानें मला पाहिलें.

हें जें एक नाटक चालू होतें त्यांत नायक नायिका आपापलीं भाषणें स्वगत आपल्याशींच किंवा जनांतिकम् पद्धतीनें करीत असत. नाटकांत मीच एक पात्र असें होतों कीं ज्याला कुठेंच कांहीं महत्त्व नव्हतें. त्यामुळें मला मात्र सगळ्यांशीं मोकळेपणानें बोलावें लागे. या माझ्या कमनशिबा-बद्दल मी पुष्कळदां स्वतःशींच तडफडत असें खरा. परंतु मध्यस्थाचें हें काम करण्याबद्दल रोजच्या रोज मला जी रोख दमडी दिडकी मिळत होती तिचा मोह कांहीं मला सुटत नव्हता. काय पण चमत्कारिक अवस्था ही !

३

त्यानंतर कांहीं दिवस मग सतीशच्या टाळकुटीला आणि भजनाला जास्तच जोर आला. पुढें एक दिवस तो माझ्याकडे आला आणि म्हणूं लागला कीं, " दामिनीला कांहीं यापुढें आपल्याजवळ ठेवतां यायचें नाहीं. "

" कां बरें ? " मीं विचारलें.

" स्त्रीच्या मोहपाशांतून आपल्याला अगदीं सर्वतोपरी मुक्त व्हायला हवें."

" पण हा मोहपाश टाळण्याशिवाय जर चालणार नसेल या आपल्या पंथामध्यें सुद्धां तर मग या मार्गामध्यें कांहींतरी मुळांतच चूक असली पाहिजे. "

आश्चर्यानें मूढ होऊन सतीश माझ्याकडे नुसता पाहातच राहिला.

तरी पण मुळींच कच न खातां मी माझा पक्ष पुढें मांडूं लागलों. " स्त्री ही सृष्टीमधील एक अत्यंत स्वाभाविक अशी वस्तु किंवा घटना आहे. आम्ही स्त्रीला जगांतून कायमची नाहींशी करण्याचा किती जरी प्रयत्न केला तरी ती या संसाराचें एक अंग म्हणून कायम राहणारच रहा-णार. आध्यात्मिक सौख्यानंदाच्या साधनासाठीं स्त्रीचें अस्तित्वच नाकारणें किंवा नाहींसें करणें हें तुम्हांला आवश्यक वाटत असेल तर मग

तुमचा आध्यात्मिक सौख्यशोधनाचा आत्मकल्याणसाधनाचा प्रयत्न म्हणजे खपुष्पाच्या शोधासारखा, किंवा मृगजळाच्या शोधासारखा होईल. आणि तुमच्या या भ्रमाचा, मायेचा निरास होऊन तुमचे डोळे साफ उघडले म्हणजे मग तुमची तुम्हांलाच इतकी शरम वाटेल कीं जगांतून कोठेंतरी तोंड काळें केल्याशिवाय सोय नाहीं असें तुम्हांला होईल. ”

“ भल्या गृहस्था, ” सतीश ओरडून म्हणाला, “ तत्त्वज्ञानाची ही तुझी काथ्याकूट बस्स कर बाबा. मी बोलत होतों प्रत्यक्ष व्यवहाराची गोष्ट. तूं कांहीं जरी म्हटलंस तरी स्त्रिया म्हणजे मायेच्या दूती, हेर आहेत ही गोष्ट कांहीं तुला नाकारतां यायची नाहीं. त्यासाठीं कांहीं प्रमाणें देत बसायला नको. मायेच्या आदेशानुसारच त्या आपल्यावर नखऱ्याचा आणि शृंगारचेष्टाचा भडिमार करीत असतात. कारण आमच्या बुद्धीला पूर्णपणें नेस्तनाबूद केल्याशिवाय त्यांना आपल्या स्वामिनीचा बेत सिद्धीस नेतांच येत नाहीं. तेव्हां आपली बुद्धि स्वतंत्र राहावी अशी इच्छा असेल तर आपण चार पावलें त्यांच्यापासून दूरच राहिलें पाहिजे. ”

यावर माझ्या बाजूनें मी चांगलें उत्तर देणार होतों तोंच सतीशनें बोट करून मला गप्प केलें आणि तो पुढें बोलूं लागला, “ विश्री, गड्या मला कीं नाहीं तुझ्याजवळ सगळं काहीं नीट अगदीं साफ साफ सांगूं दे. आपल्या येथील व्यवहारामध्यें मायेचा हस्तक्षेप तुला दिसून येत नाहीं याचें कारण तूं कळत किंवा न कळत स्वतःला मायेच्या जाळ्यांत अडकवून घेतलें आहेस. आज सौंदर्याच्या ज्या मोहिनीनें तिनें तुला आपला गुलाम करून टाकलें आहे ती सौंदर्यमोहिनी तिचें जें कार्य आहे तें कार्य पुरें होतांक्षणींच पार कोठल्या कोठें नाहींशी होऊन जाईल. आणि डोळ्यांवर कामवासनेचा चष्मा चढल्यामुळें जी ही सौंदर्यमोहिनी—सौंदर्याभास—साऱ्या जगाहून तुला जास्त मोठी वाटत आहे तो कामवासनेचा चष्माही त्या सौंदर्यमोहिनीबरोबरच नाहींसा होऊन जाईल. गळ्याभोंवती पडणारा मायेचा हा गळफास इतका उघड उघड दिसून येत असतां अविचारानें भलतेंच साहस करण्यांत आणि धोक्याच्या अवस्थेंत राहण्यांत काय अर्थ आहे ? ”

“ तूं म्हणतोस तें सगळें मला कबूल आहे ” मीं उत्तर केलें. “पण

भल्या माणसा, या जगांत दशदिशा व्यापून टाकणारें हें जाळें कांहीं माझ्या या हातांनीं मी जगावर पसरलेलें नाहीं किंवा त्याच्यामधून कसें निसटून जावें याचा उपाय पण मला माहीत नाहीं. खरें पाहिलें तर मायेला टाळण्याची शक्ति कांहीं आपल्या आंगीं नाहीं. तेव्हां आपल्या आध्यात्मिक तपश्चर्येचें बळ असें असायला हवें कीं मायेचें हें अस्तित्व मान्य करूनच आपल्याला तिच्यावर मात करतां आली पाहिजे. आमच्या आध्यात्मिक तपश्चर्येला आपण हें असें वळण लावूं शकत नाहीं यामुळेंच तर सत्याचा, सताचा अर्धा भाग कापून फेंकून देण्याच्या वृथा धडपडींत आमचें हें तारूं खडकावर आपटून फुटण्याच्या बेतांत आहे."

" ठीक ठीक; पण आध्यात्मिक साधनेबद्दलची तुझी कल्पना आणखी थोडी स्पष्टपणें कळूं देशील का तूं आम्हांला ?"

त्यावर मी उत्तर दिलें, " या सृष्टीच्या प्रवाहाच्या पलीकडे जर आपल्याला आपली जीवितनौका न्यावयाची असेल तर सृष्टीच्या ओघाच्या प्रवाहाच्या आंगानेंच ती आपल्याला हांकारली पाहिजे. प्रवाहाच्या विरुद्ध हाकारून कांहीं परतीर आपल्याला गांठतां येणार नाहीं. हा प्रवाहच नाहींसा कसा करून टाकतां येईल हा कांहीं आपल्यापुढचा प्रश्न नाहीं. तर तो ओलांडून पलीकडे पोंचेपर्यंत आपली जीवितनौका त्याच्यावर तरून कशी राहील एवढेंच आपल्याला पाहावयाचें आहे. नांव जर नीटपणें तरून जावयाला हवी असली तर सुकाणूची खास आवश्यकता आहे."

" तुम्ही लोकांनीं स्वामीजींवरची निष्ठाच पार सोडून दिली आहे— त्या तुम्हांला, हें सुकाणूं म्हणजेच आपल्याला हवें असलेलें हें सुकाणूं आहे हें मी तुमच्या गळीं कसें उतरवूं शकणार ? तुम्ही तर आपल्या आध्यात्मिक जीवनाची दिशा निव्वळ आपल्या लहरीप्रमाणें ठरवूं चाहतां आहां. पण ज्या मार्गानें तुम्ही जातां आहां त्यांत तुमचा नाश आहे— मरण आहे !" एवढें बोलून सतीश तडक तेथून चालता झाला आणि स्वामीजींच्यापाशीं जाऊन भक्तिभावपूर्वक त्यांचे पाय चुरीत बसला.

त्याच दिवशीं संध्याकाळीं, स्वामीजींची चिलीम भरून देत असतां, माया आणि तिच्या दूती यांच्याविरुद्ध ही आपली फिर्याद त्यानें स्वामी-

जींच्या कानावर पण घातली. पण एक चिलीम ओढण्याला लागणाऱ्या वेळांत कांहीं त्या फिर्यादीची सुनावणी संपून तिचा कसलाही निकाल लागला नाहीं. रोजच्या रोज संध्याकाळीं चिलमीवर चिलमी फस्त होत होत्या. तरी पण या फिर्यादीच्या बाबतींत काय करावें याचा कांहीं स्वामीजींना निश्चय करतां येत नव्हता.

अगदीं पहिल्यापासूनच या दामिनीनें स्वामीजींना किती मनस्वी त्रास दिला होता तें कांहीं विचारूं नका. त्यांत भरीला आतां आणखी या पोरीनें त्यांच्या भक्तांच्या आणि शिष्यांच्या आध्यात्मिक प्रगतीच्या संथ प्रवाहांत हा भलताच भोंवरा उत्पन्न करून ठेवला होता. पण शिवतोषांनीं तिचा आणि तिच्या सर्व मालमत्तेचा साराच भार स्वामीजींच्यावर टाकला होता. इतका कीं तिला दूर तरी कशी करावी आणि दुसरीकडे तिची सोय कशी लावावी याचा कांहीं उपायच त्यांना सांपडेना. सगळ्यांत अडचणीची गोष्ट आणखी ही होती कीं स्वामींना मनांतल्या मनांत आपल्या या पाल्य पोरीची एक प्रकारची भीति वाटत असे.

आणि बिचारा सतीश—मारे दुप्पट आणि चौपट उत्साहानें त्यानें भजनकीर्तनाची धून आणि टाळकूट मांडली होती, आणि स्वामीजींच्या चिलमी भरून व त्यांची पादसेवा करून आपलें हृदय शांत करण्याची त्यानें किती जरी धडपड चालविली होती तरी, तरी पण त्याच्या आध्यात्मिक साधनेच्या मार्गांत मायेनें आपलें ठाण मांडून त्याची सारी प्रगति अडवून टाकलेली होती या गोष्टीचा एक क्षणभरसुद्धां त्या बिचाऱ्याला विसर पडणार नाहीं असे प्रकार सतत घडत होते. दामिनीनें जणुं असा विडाच उचलला होता.

एके दिवशीं आमच्या तेथें प्रख्यात भजनी निरूपणकार आले होते आणि शेजारच्या देवळांत संध्याकाळीं त्यांचें निरूपण आणि भजन सुरू व्हावयाचें होतें. हा कार्यक्रम पुष्कळ रात्र होईपर्यंत चालणार होता. सुरुवातीपासूनच तेथें खूप गर्दी झाली होती. तेव्हां एवढ्या त्या गर्दींत मी नसलों तरी तें कोणाच्या लक्षांत येणार आहे, माझी एवढी कोण चौकशी करणार आहे, असा विचार करून सुरुवातीचें नमन झाल्यावर तेथून काढता पाय घेऊन कसा तरी मी निसटून आलों.

दामिनीनें त्या दिवशीं आपली संकोच वृत्ति पार कोठल्या कोठें झुगारून दिली होती. पुष्कळ गोष्टी अशा असतात कीं त्या बाहेर बोलून दाखविणें फार कठिण असतें. तोंडांतून त्या बाहेर पडतच नाहींत; बोलूं म्हटलें तर घसाच गुदमरल्यासारखा किंवा बसल्यासारखा होतो. अशाच किती तरी गोष्टी आज दामिनीच्या तोंडून अगदीं किती सहजी आणि किती मधुर-पणें बाहेर पडत होत्या. त्या दिवशीं जणुं कांहीं आजपर्यंत पार अंधारांत कोठें दडून राहिलेलें स्वतःच्या अंतःकरणाचें एखादें खोल दालनच तिला सापडल्यासारखें झालें होतें; कांहीं तरी चमत्कारिक योगायोगामुळें जणुं कांहीं स्वतःची मूर्ति अगदीं हुबेहूब प्रत्यक्ष आपल्यासमोर उभी कर-ण्याची संधि तिला लाभली होती.

त्याच वेळीं सतीश तेथें मागच्या बाजूनें आला आणि आंत यावें कीं न यावें या विचारानें तेथेंच थबकून उभा राहिला. थोडा वेळ आम्हांला हें समजलेंच नाहीं. दामिनी म्हणजे कांहीं विशेष गुह्य गोष्ट सांगत होती असें नव्हे; पण तिचे डोळे मात्र पाण्यानें डबडबले होते; तिचे सारेच शब्द खरोखर जणुं एखाद्या अश्रूंनीं भरून वाहणाऱ्या अशा भू–विवरांतूनच उस-ळून वर येत होते. सतीश आमच्या तेथें आला तेव्हां भजन आटोपण्याची कांहीं वेळ झालेली नव्हती; उलट किती तरी अवकाशच होता अजून आटोपण्याला. तेव्हां त्या वेळीं इतक्या लौकर तो जो तेथून निघाला त्याला कारण त्याच्या अंतःकरणांत पुनःपुन्हा उत्पन्न होणाऱ्या कांहीं तरी तीव्र वासनांनींच त्याला तेथें खेंचून आणलेलें असलें पाहिजे हें माझ्या तेव्हांच लक्षांत आलें.

सतीश थोड्या वेळानें आमच्या समोर आला तेव्हां दामिनी चमकूनच उठली. तिनें डोळेबिळे पुसले आणि ती आंतल्या भागाकडे जायला झपा-ट्यानें निघाली. सतीश कांपऱ्या आवाजानें तिला म्हणाला, "दामिनी, माझें ऐकतेस थोडें ? तुझ्याशीं कांहीं थोडें बोलायचें आहे मला."

अगदीं हळू हळू परत येऊन दामिनी परत आपल्या पहिल्या जागीं बसली. आपण आपलें तेथून निघून जावें म्हणून मी थोडें उठल्यासारखें केलें तोंच सतीशनें इतक्या कांहीं केविलवाण्या नजरेनें जाऊं नको म्हणून मला खुणविलें कीं माझी उठण्याची हालचाल मनांतल्या मनांतच जिरली.

दरम्यान काय बोलावें याचा कांहीं निश्चय मोठ्या प्रयत्नपूर्वक स्वतःशीं करून सतीश एकदम मुख्य मुद्यावर येऊनच दामिनीला म्हणाला,

"दामिनी, आम्ही जसे कांहीं एका माध्याच्या हेतूनें प्रेरित होऊन स्वामीजींच्या चरणांपाशीं आलों तशा हेतूनें कांहीं तूं त्यांच्याकडे आलेली नाहींस."

"अर्थात् नाहीं." अशी स्वच्छ कबूली देऊन आतां त्यावर तो पुढें काय बोलतो हें ती मोठ्या उत्सुकतेनें पाहूं लागली.

"तर मग तूं स्वामीजींच्या भक्तगणांमध्यें उगीचच कां राहतेस?"

दामिनीचे डोळे लालबुंद झाले, आगीची जणुं ज्वाळच तिच्या दृष्टी-मधून बाहेर पडते आहेसें वाटूं लागलें, ती बोलूं लागली तेव्हां. ती मोठ्यानें ओरडून म्हणाली, "का राहतेस म्हणून विचारतां मला? मी काय या ठिकाणीं आपण होऊन आलें? कुठें कुणाचा आसरा नाहीं अशी एक मी निराधार प्राणी होतें; या तुमच्या धर्मकर्मावर माझा काडीचा सुद्धां विश्वास नव्हता. तरी पण माझे जणुं हात पाय जखडून बांधून तुमच्या या भक्तमंडळानेंच मला या भक्तीच्या तळघरांत आणून कोंडून घातलें आहे ना? कोठें जाऊं मी! कोठें जायला मला तुम्ही जागा तरी ठेवली आहे का?"

सतीशनें गंभीरपणें उत्तर दिलें, "आम्हीच आतां असें ठरविलें आहे कीं, तूं जर कोणा नातेवाइकाकडे जाऊन राह्यला कबूल असलीस तर तुझ्या खर्चाविर्चाची सगळी व्यवस्था आम्ही करूं."

"तुम्ही असं ठरवलं आहे म्हणतां? तुम्ही?"

"होय!"

"असेल, ठरवलं असेल—पण मी कांहीं अजून तसं ठरवलेलं नाहीं."

"कां बरं? काय हरकत आहे तुझी? काय गैरसोय होणार आहे त्यानं तुझी?"

"मी म्हणते, मी काय तुमच्या भक्तमंडळांतल्या खेळांतलें एखादें सोंगटें आहे कीं, तुम्हांला वाटेल तेव्हां वाटेल त्या ठिकाणीं कधीं या घरीं नाहीं तर कधीं त्या घरीं उचलून ठेवावें?"

आश्चर्यातिरेकानें सतीशची वाचाच बंद झाल्यासारखी झाली.

दामिनी पुढें बोलूं लागली, " मी जी इथें आलें ती तुम्हां भक्त-मंडळाची मर्जी संभाळायला; तुम्हांला गोड वाटावें म्हणून आलें नाहीं. आणि आतां माझ्यावर तुम्हां भक्तजनांची मर्जी खुष होत नाहीं एवढ्या-साठीं तुम्ही लोक मला जायला हुकूम करूं पाहतां आहां; पण त्या हुकुमा-साठीं मी जाणारही नाहीं. "

एवढें बोलून दामिनीनें हातांनीं आपलें तोंड झांकून घेतलें. आणि मोठ्यानें हुंदके देत देत जवळ जवळ धांवतच ती आपल्या खोलींत गेली आणि खोलीचें दार धाडकन तिनें बंद करून घेतलें.

सतीश कांहीं तेथून भजनाच्या धुनींत जाऊन परत सामील झाला नाहीं. शेजारच्याच गच्चीवर एका कोपऱ्यांत तो आडवा झाला आणि कांहीं न बोलतां एकटाच तेथें मनाशीं विचार करीत पडला.

दूर समुद्रकाठावरून दक्षिण वाताच्या झुळुकांवर झोके खात खात लाटांचा ध्वनि येत होता तो पृथ्वीच्या अगदीं थेट हृदयांतून बाहेर पडून खालीं नजर लावून बसलेल्या वरच्या आकाशस्थ तारकापुंजापर्यंत पोंचूं पाह-णाऱ्या दीर्घ निराशेच्या उच्छ्वासाप्रमाणें भासत होता.

उरलेली रात्र मी मग त्या खेडगांवच्या निर्मनुष्य गल्ल्या कुचांतून उगीचच पुन:पुन्हा भटक्या मारीत घालविली.

४

सगुण पूजेचा प्याला कल्पनामृतानें भर भरून देऊन सतीशला आणि मला स्वानंदसाम्राज्याच्या प्रांतांतून परमसुखधामाच्या बाहेर पडूं न देण्याची खटपट स्वामीजींची सतत चाललेली होती. पण या स्वानंदसाम्राज्याच्या गडावर आतां जड सृष्टीकडून फार मोठा निग्रहाचा हल्ला चढविला गेला होता. सगुण आणि निर्गुण, जड आणि आध्यात्मिक, वास्तविक आणि काल्पनिक यांच्या या झगड्यांत काल्पनिकाचा पूर्ण पराभव होणार आणि भक्तिभावामृताचा पेला सांडून त्यांतलि तें अमृत धुळीला मिळणार असा बहुतेक रंग दिसूं लागला आहे. गुरुमहाराजांच्याही नजरेंतून ही गोष्ट सुटली आहे असें नव्हे.

सतीश आतां अगदींच बेभान झाला होता. उंच आभाळांत गेल्यावर

दोरा तुटल्यावर कागदांच्या पतंगाची जी अवस्था होते तशी त्याची अवस्था झाली आहे. अजून तो अस्मानांत पुष्कळ उंचावर आहे; परंतु गिरक्या खायला लागून केव्हां जमिनीवर धडपडेल याचा आतां नेम राहिलेला नाहीं. त्याच्या भजनपूजनांत किंवा हठयोगांत बाहेरून अजून तो पूर्वीचाच नियमितपणा आणि कठोरपणा कायम आहे. परंतु जरा जास्त बारकाईनें पाहिलें तर त्याची निष्ठा निर्बल होण्याच्या मार्गाला लागली आहे हें दाखविण्याजोगी डळमळ त्याच्या ठिकाणीं सुरू झालेली आहे हे कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें होतें.

माझ्या अवस्थेपुरतें पाहिलें तर दामिनीनें तिच्यांत कांहीं संशयितपणा शिल्लकच ठेवला नाहीं. त्यामुळें तर्कवितर्काला कांहीं त्याबद्दल अवसरच राहिलेला नाहीं. जों जों आपल्या तशा वागण्यानें स्वामीजींच्या चेहऱ्यावर भयाची जाणीव जास्त जास्त तिला दिसूं लागली आणि सतीशच्या चेहऱ्यावर दुःख दिसूं लागलें तों तों आपल्या कामासाठीं ती मला अधिकाधिकच आपल्या भोंवतीं नाचवूं लागली.

शेवटीं शेवटीं तिची मजल इथपर्यंत येऊन ठेपली कीं आम्ही जरी प्रत्यक्ष स्वामीजींशीं चर्चा करण्यांत गुंतलेले असलों तरी तिनें तेथें दारांत यावें आणि आमच्या बोलण्याच्या मध्येंच म्हणावें, "श्रीविलास बाबू, जरा इकडे येऊन जातां ?" मला कशासाठीं बोलावलें आहे हें सांगण्याचीसुद्धां तिला जरूर पडूं नये !

स्वामीजींनीं माझ्याकडे वळून पाहावें; सतीशनेंही मान वर करून नजर माझ्या नजरेला भिडवावी. त्यांच्या तेथेंच बसावें कीं दामिनीकडे जावें असा एक क्षणभर माझ्या मनाचा गोंधळ व्हावा. पण डोळ्याचें पातें लवतें न लवतें तों मी कुंपणावरून उडी मारून बाहेर धांवा घेणाऱ्या गुराप्रमाणें खोलींतून बाहेर निघून जावें. मी गेल्यावरही सुरू झालेली चर्चा तशीच पुढें चालू ठेवण्याची धडपड होत असे. पण शेवटीं ही धडपड इतकी अवघड व्हावी कीं, त्या धडपडींत विचाऱ्या चर्चेचाच अंत व्हावा.

आमचें सारेंच गाडें जिकडून तिकडून विस्कळित झाल्यासारखें झालें. पूर्वींचा तो एकसूत्री सुटसुटीतपणा अजिबात नाहींसा झाला.

स्वामीजींच्या पंथांचे आम्ही दोघे म्हणजे दोन मोठेच आधारस्तंभ होऊन राहिलों होतों. या दोन खांबांपैकींच एखादा निसटून पडूं लागला तर तसें न होऊं देण्यासाठीं स्वामीजींनीं जिवाचें रान करावें हें स्वाभाविकच होतें. म्हणून त्यांनीं एक दिवस पुन्हा दामिनीजवळच गोष्ट काढून पाहिली. ते तिला म्हणाले, " बाई ग, यापुढें आम्हांला जास्तच अडचणीचा आणि कष्टाचा प्रवास आरंभावा लागणार आहे. म्हणून तूं येथूनच परत जावेंस हें बरें."

" परत कुठें जाणार मी ? "

" घरीं. तुझ्या आत्याबाईकडे. "

" तें नाहीं जमायचं. "

" कां ? "

" पहिली गोष्ट अशी कीं, " दामिनीनें उत्तर केलें, " ती कांहीं खरी-खुरी आत्या नव्हे. उगीच तिच्यावर माझा भार कां ? "

" पण तुझा सगळा खर्चवेंच आम्ही करूं."

" पण भार म्हणजे फक्त खर्चाचाच वाटतो माणसाला असें नव्हे. माझी काळजी घ्यावी, माझें हवें नको पाहावें यांच्याशीं तिला काय करायचें आहे ? तिचें कांहीं तें काम नाहीं ! "

अगदीं हातटेकीस येऊन स्वामीजी म्हणाले, " पण दामिनी तूं पहा, कीं सारा जन्म मी कां तुला संभाळीत राहूं ? "

" हा काय माझा प्रश्न आहे ? "

" आणि समज मी उद्यां मेलों, तर मग तूं कुठें जाशील ? "

दामिनी अगदीं थंडपणानें म्हणाली, " या गोष्टींचा विचार करण्याची सवड मला कुणी आजपर्यंत दिलेलीच नाहीं. ती जबाबदारी माझ्यावर टाकलेलीच नाहीं. उलट मुद्दाम होऊनच मला अगदीं ढळढळीतपणें अनुभवाला आणून दिलेलें आहे कीं या जगात माझें कुणी नाहीं नी कांहीं नाहीं. बाप नाहीं, भाऊ नाहीं; घर नाहीं, मालमत्ता नाहीं; माझें म्हणावें असें या जगांत कांहीं म्हणून ठेवलेलें नाहीं. म्हणून तर मला काय किंवा इतर कुणाला काय माझा भार असह्य होतो. नकोसा होतो तो भार तुम्ही

आपण होऊन हौशीनें स्वतःच्या आंगावर घेतलेला आहे. आतां तो मी तुम्हांला दुसऱ्या कुणाच्या आंगावर लोटूं देणार नाहीं."

एवढें बोलून दामिनी आपली चालती झाली.

"शिव शिव, त्राहि त्राहि भगवान्" स्वामी उद्गारले.

माझ्यासाठीं कांहीं चांगलीं बंगाली पुस्तकें आणा असा दामिनीनें मजवर हुकूम फर्माविला होता. अर्थात् चांगलीं म्हणजे आध्यात्मिक किंवा धार्मिक (आमच्या पंथामध्यें विशेष प्रिय असलेले ग्रंथ) असा दामिनीचा अर्थ नव्हता हें कांहीं मीं आतां सांगितलें पाहिजे असें नव्हे. आणि मजजवळून कोणतीही वस्तु मागायला दामिनीला यत्किंचित्ही संकोच वाटत नसे हेंही मी सांगत बसलें पाहिजे असेंही नाहीं. तिच्यासाठीं मी जें कांहीं थोडेफार करीत असें त्याचा मोबदला देण्याचा उत्कृष्ट मार्ग म्हणजे माझ्याकडून अशा बऱ्याचश्या मागण्या उकळणें हा होय हें कळून यायला तिला कांहीं फारसा वेळ लागला नाहीं. बाकी सृष्टीचा हा नियमच नाहीं का? कांहीं झाडेंच अशीं असतात कीं जों जों खडसावीं तों तों तीं अधिक बहराला येतात. दामिनीच्या पुरतें पाहिलें तर मीही एक अशाच प्रकारचा मनुष्य होतों असें म्हटलें पाहिजे.

तेव्हां मीं जीं पुस्तकें आणविलीं तीं अगदीं उघड उघड शंभर नंबरी आधुनिक. त्यांच्या लेखकावर मनूपेक्षां मानवाचाच परिणाम कितीतरी पटीनें जास्त झालेला स्पष्ट स्पष्टच दिसण्यासारखा होता. पुस्तकांचें तें पार्सल पोष्टमनानें स्वामीजींच्या जवळ आणून दिलें. तें उघडून पाहून स्वामीजींनीं भुवया वर चढवून विचारलें, "अरेच्या! श्रीविलास, हीं असलीं पुस्तकें कशासाठीं?"

मी कांहीं न बोलतां गप्प राहिलों.

स्वामीजींनीं मग अगदीं उडत उडत, जणुं कांहीं हा विटाळ जितका टाळतां येईल तितका टाळावा अशा रीतीनें कांहीं पानें चाळून पाहिलीं. आणि मग मुद्दाम माझ्या कानांवर येईल अशा रीतीनें ते म्हणतात,

"या ग्रंथकाराबद्दल मला कधींच आदर वाटला नाहीं. त्याच्या लिखाणांत खऱ्या आध्यात्मिक प्रवृत्तीची लज्जत मुळींच नाहीं."

मी एकदम अविचारानें बोलून गेलों, "तुम्हीं जर हे ग्रंथ नीट काळजी-

पूर्वक वाचलेत स्वामीजी, तर त्यांत सत्याची लज्जत मात्र कमी नाहीं हें खास तुमच्या प्रत्ययाला येईल."

अशा रीतीनें माझ्या तोंडून उद्गार निघण्याचें कारण कीं स्वामीजीं-विरुद्ध बंडाची प्रवृत्ति अलीकडे माझ्या ठिकाणीं चांगलीच बळावत चाललेली होती. त्यांच्या त्या गूढ आध्यात्मिक भावकुंडांत मला आतां अगदीं गुदमरल्यासारखें व्हायला लागलें होतें. प्रत्यक्ष चालत्या माणसांना दूर करायचें, आणि केवळ अमूर्त मानवी भावनांची आळवणी करून बावळटासारखें जिभल्या चाटीत आणि लाळ घोटीत बसायचें याची मला आतां अगदीं किळस येऊन गेली होती.

माझ्याकडे चमत्कारिकपणें डोळे मिचकावीत पाहून स्वामीजी म्हणाले, "कांहीं हरकत नाहीं, बाळ, अगदीं काळजीपूर्वक वाचीन बरं हीं पुस्तकें मीं, जरूर वाचीन!" असें म्हणून स्वामीजींनीं तीं पुस्तकें आपल्या पाठीमागच्या तक्क्यामागें सारलीं. माझ्या हातीं तीं लागूं द्यायचीं नाहींत हा यांत त्यांचा डाव होता हें मी सहज ओळखलें.

दाराच्या आड उभी राहून दामिनीला बहुधा ही सगळी गोष्ट ध्यानांत आली असली पाहिजे. कारण ताबडतोबच तिनें आमच्या तेथें प्रवेश केला आणि मला विचारलें, "परवां माझ्यासाठीं तुम्हीं तीं पुस्तकें मागविलीं होतीं तीं अजून आलीं नाहींत?"

मी स्तब्ध राहिलों.

स्वामीजीच म्हणाले, "बाई ग, हीं पुस्तकें तुला वाचण्यासारखीं नाहींत."

"पण मला असं सांगा, हें आपल्याला कसं काय समजलं? तुम्हांला काय त्यांतलं ठाऊक आहे?"

रागानें लाल होऊन स्वामीजी घोगऱ्या आवाजांत म्हणाले, "समजा मला नाहीं समजलं, तरी तुला तरी माझ्यापेक्षां जास्त काय ठाऊक असणार त्यांतलं?"

"या ग्रंथकाराचे ग्रंथ मीं वाचलेले आहेत. आणि आपण ते वाचले असल्याचा संभव नाहीं, म्हणून."

"एकदां वाचलीं आहेत म्हणतेस तर मग पुन्हां वाचायची काय जरूर आहे?"

" म्हणे मला काय जरूर आहे? तुम्हांला एखाद्या गोष्टीची जरूर असली म्हणजे काय वाटेल तें झालें तरी तुमची गरज पुरी झालीच पाहिजे! इथें एक मी तेवढी अशी आहे कीं मला कांहीं कशाची जरूर नाहीं, गरज नाहीं. असंच ना?" दामिनी उसळून म्हणाली.

" तूं भानावर दिसत नाहींस दामिनी. तूं विसरतेस कीं मी संन्यासी आहें. सांसारिक गरजा मला बिलकूल राहिलेल्या नाहींत."

" पण तुम्ही हें विसरतां कीं मी कांहीं संन्यासिनी नाहीं. हीं पुस्तकें वाचण्याची मला इच्छा आहे. मग देणार कीं नाहीं तुम्हीं तीं पुस्तकें मला, सांगा."

स्वामीजींनीं आपल्या मागच्या तक्क्याखालून पुस्तकें पुढें ओढलीं आणि माझ्याकडे भिरकावून दिलीं. मीं तीं नीट जमा करून सगळीं दामिनीच्या स्वाधीन केलीं.

याचा परिणाम मात्र असा झाला कीं जीं पुस्तकें दामिनीनें एकटीनेंच बसून आपल्याशीच वाचली असतीं तीं आता स्वतःला वाचून दाखविण्यासाठीं मला ती बोलावून घेऊं लागली. मागें आमच्या खोल्यांच्या पुढच्या बाजूला छप्पराचा व्हरांडा होता गच्चीवर, म्हणून सांगितलें ना मी त्याच व्हरांड्यांत बसून आमचा हा वाचनाचा कार्यक्रम चाले. आमच्या आंगावरून सतीश पुष्कळ येरझारा करी; आमच्यांत येऊन बसावें असें पुष्कळ त्याच्या मनांत होतें. पण आम्ही कांहीं कोणी त्याला ये म्हणत नव्हतों, त्यामुळें येऊन बसण्याचा त्याला धीर होत नव्हता.

वाचतांना एक दिवस आम्हांला एक अत्यंत विनोदी भाग लागला होता. आणि दामिनीची हंसून अगदीं मुरकुंडी वळून गेली होती. देवळामध्यें कसलासा उत्सव चालू होता. तेव्हां सतीश तिकडेच असेल अशी आमची समजूत होती. पण इतक्यांत आमच्या पाठीमागचें दार वाजल्याचा आवाज झाला; आणि त्यांतून अगदींच अकस्मातपणें सतीश आमच्यापाशीं आला व आमच्या शेजारीं बसला.

दामिनीचें हंसणें एकाएकीं बंद झालें. मला पण थोडें चमत्कारिक वाटल्यासारखें झालें. सतीशजवळ कांहीं तरी बोलावें असें मला खूप खूप वाटत होतें. पण एक शब्दसुद्धां सुचेना मला. आणि म्हणून कांहीं न

बोलतां पुस्तकाचीं पानें उगीचच नुसतीं मी एकापुढें एक उलटीत बसलों. सतीश उठून उभा राहिला आणि जसा अकस्मात् तो आला तसाच अकस्मात् तो तिथून निघून गेला. आमचें वाचन कांहीं त्या दिवशीं मग आणखी पुढें होऊं शकलें नाहीं.

माझ्यामध्यें आणि दामिनीमध्यें संकोचाचा पडदा बिलकूल शिल्लक नव्हता याचें सतीशला वाईट वाटत होतें; तर सतीश आणि दामिनी यांच्यामध्यें असा पडदा शिल्लक होता याचें मला वाईट वाटत होतें. ही गोष्ट सतीशला समजून आलेली असावी हजार हिश्श्यांनीं. त्याच दिवशीं त्यानें स्वामीजींजवळ प्रार्थना केली कीं, " समुद्रकांठीं दूर कोठें तरी अगदीं एकांतांत आठ दिवस राहून यावें असें मला वाटतें आहे. तरी परवानगी असावी आठवड्यांत मी खास परत येतों. " " अगदीं लाखाची गोष्ट बोललास, बाळा, " असें म्हणून स्वामीजींनीं मोठ्या उत्साहानें त्याच्या बेताला संमति दिली.

सतीश निघून गेला. त्यानंतर वाचण्यासाटीं मला दामिनीनें पुन्हां बोलाविलें नाहीं. माझ्यापासून कांहीं मागण्याची किंवा काम करून घेण्याची पण तिला गरज पडली नाहीं. तसेंच आपल्या शेजारपाजारच्या मैत्रिणींकडे बसायला जातांनाही त्यानंतर ती मला दिसली नाहीं. खोलींतल्या खोलींत दारें बंद करून ती बसून राही.

असे कांहीं दिवस गेले. एक दिवस तिसरे प्रहरीं आमच्या त्या व्हरांड्यांत बसून मी पत्र लिहीत होतों. स्वामीजींची निभ्रांतपणें वामकुक्षी चाललेली होती. इतक्यांत सतीशची स्वारी परत आली. माझ्याकडे अगदीं ढुंकूनसुद्धां न पाहतां तो तडक दामिनीच्या खोलीच्या दाराशीं गेला आणि दारावर टकटक वाजवून त्यानें हांकही मारली,

" दामिनी, दामिनी ! "

तत्क्षणीं दामिनी बाहेर आली. या वेळीं हे एकदम कोठून हाका मारतात म्हणून ती पाहते तों तिच्यापुढें उभ्या असलेल्या सतीशची काय अवस्था तिनें पाहिली ! वादळामध्यें सांपडून दोर तुटले आहेत, शिडें फाटलीं आहेत, आणि जागोजाग कवच्या उडाल्या आहेत अशी जशी जहाजाची अवस्था व्हावी तशी सतीशची अवस्था झालेली होती. डोळे

एखाद्या रानटी हिंस्र पशूसारखे, केस अस्ताव्यस्त, चेहरा आणि हात-पायही ओढलेले आणि गळलेले आणि कपडे धुळीनें मळलेले असा त्याचा अवतार होता.

" दामिनी " सतीश तिला पाहतांच म्हणाला, " आमच्या येथून तूं जा म्हणून मी तुला सांगितलं. पण माझी ती चूक झाली. त्याबद्दल मी तुझी क्षमा मागतों. "

दामिनीला फार वाईट वाटलें. आपल्या हाताचीं बोटें एकमेकांत घट्ट अडकवीत संत्रस्तपणें ती म्हणाली, " असलं उगीच भलतंच कांहीं बोलूं नका. "

पण सतीशनें आपलाच हेका कायम टेवला: तो म्हणाला, " तूं मला क्षमा करायला हवीच. माझ्या आध्यात्मिक उन्नतीच्या मार्गांत मला जरूर पडेल तेव्हां मी तुला जवळ करूं शकेन किंवा दूर लोटूं शकेन अशा प्रकारचा जो अहंकार माझ्या ठिकाणीं निर्माण झाला होता, तसा अहंकार पुन्हा मी बाळगणार नाहीं. असली अमंगळ पापी कल्पना पुन्हां माझ्या मनांत येणार नाहीं असें मी तुला वचन देतों. तूं पण मला एका गोष्टीचें वचन देशील का ? "

दामिनीनें त्याच्यापुढें अत्यंत नम्रतापूर्वक लवून नमस्कार केला आणि म्हटलें, " काय आज्ञा आहे ? आपण म्हणाल तें मी करीन. "

" तूं आमच्यामध्यें येऊन मिसळलें पाहिजेस. असं दूर दूर राहतां कामाचं नाहीं. "

" येत जाईन बरं मी तुमच्यामध्यें; झालं. " दामिनी म्हणाली. "पुन्हां माझ्या हातून अशी चुकी घडणार नाहीं " असें म्हणून त्याच्या पायाची धूळ घेण्यासाठीं ती पुन्हां खालीं वाकली तेव्हां हळूच म्हणाली, " माझ्या हातून पुन्हा असलं पाप घडणार नाहीं. "

५

पुन्हां एकदां दगडाचा तापून रस झाला होता. दामिनीचें चित्त भांबावून टाकणारें तेज अद्यापि जसेंच्या तसें कायम होते. पण त्यामधील दाहकता मात्र आतां नाहींशी झाली होती. तिच्या सौंदर्याची कळी पूजेअर्चेत, भजनकीर्तनांत

आणि सेवेमध्यें पुन्हां चांगली बहराला आली. फुलून विकसित झाली, भजन-कीर्तनाच्या वेळीं, किंवा स्वामीजींच्या पुराणाच्या किंवा प्रवचनाच्या वेळीं आतां ती कधीं गैरहजर नसे. तिच्या वेषभूषेंतसुद्धां फारच बदल झाला. टसर रेशमाचीं साधीं केशरी पातळें ती पुन्हां परिधान करूं लागली आणि आमच्या मेळाव्यांत येतेवेळीं स्नान वगैरे केल्याशिवाय तशीच येईनाशी झाली.

स्वामीजींशीं तिला बोलण्याचालण्याचा प्रसंग येई त्या वेळीं तिला अत्यंत कठिण अशा कसोटीच्या दिव्यांतून जावें लागे. तेथें तिची खरी परीक्षा होई. स्वामीजींच्या पुढें नमस्कारासाठीं ती वांके त्या वेळीं तिच्या अर्धवट मिटलेल्या डोळ्यांमध्यें मोठ्या कष्टानें दाबून ठेवलेली क्रोधाची चमक माझ्या नजरेंतून कांहीं निसटूं शकत नसे. स्वामीजींचे हुकूम पाळावे लागावें, हें तिला अगदीं बिलकूल सहन होत नसे हेंही मला पक्कें समजून चुकलें होतें. तथापि तिनें आत्मसंयमन इतकें जबरदस्त आणि परिपूर्ण केलें होतें कीं त्या अत्यंत आधुनिक आणि कांहींच ताळतंत्र न ठेवणाऱ्या नास्तिक बंगाली ग्रंथकाराच्या गर्हणीय विचारसरणीबद्दलची आपली नापसंती पुन्हां एकदां व्यक्त करण्याचा धीर स्वामीजींना करतां आला. दुसऱ्याच दिवशीं त्यांच्या आसनाजवळ फुलांची एक भली मोठी रास आणि तिच्यामध्यें दडवून ठेवलेला त्या निषेधार्ह ग्रंथकाराच्या पुस्तकांच्या फाडलेल्या पानांचा चुरा त्यांना दिसून आला.

सतीशनें स्वामीजींची अंगसेवा करावी या गोष्टीची दामिनीला विशेषच चीड होती हें मी नेहमीं बघत होतों. आतां तिच्यामध्यें झालेल्या या परिवर्तनानंतरसुद्धां स्वामीजी ज्या वेळीं सतीशला आपली स्वतःची कांहीं सेवा करावयाला सांगत त्या वेळीं दामिनी घाईघाईनें सतीशच्या आंगावरूनच पुढें जाऊन त्याच्या आधींच सांगितलेलें काम करून टाकी. तथापि प्रत्येकच वेळीं हें असें साधत असे असें नाहीं. आणि मग स्वामीजींच्या चिलमीवरील निखारा पेटविण्यासाठीं सतीश फुंकर घालूं लागला म्हणजे मनांत पेट घेणारा राग बाहेर पडूं नये म्हणून स्वतःवर ताबा ठेवण्यासाठीं दामिनीला किती मनस्वी कष्ट पडत ! अशा वेळीं ती आपले दांत ओठ आवळून तोंडांतल्या तोंडांत स्वतःशींच पुटपुटत राह्यची, " पुन्हां अशी चूक मी होऊं देणार नाहीं, पुन्हां मी चुकणार नाहीं. "

परंतु ज्यासाठीं म्हणून सतीशनें ही सारी खटपट केली होती तें कांहीं यामुळें घडून आलें नाहीं. याच्या आधीं एकवार दामिनीनें आपला हट-वादीपणा सोडून देऊन स्वतःला आमच्या या भजनपूजनांत सामील करून घेतलें होतें. त्या वेळीं तिच्या त्या आत्मसमर्पणांतील सौंदर्यच तेवढें सतीशच्या नजरेस आलें होतें. हें आत्मसपर्मण करणाऱ्या तिचें व्यक्तिगत सौंदर्य कांहीं त्याला त्या वेळीं दिसलें नव्हतें. आतां या वेळीं मात्र त्याचें अंतःकरण स्वतः दामिनीनें इतकें कांहीं व्यापून टाकलें होतें कीं भजनकीर्तनामधील सर्व स्वरमाधुर्य आणि तत्त्वज्ञानाचे सर्व गहन विचार त्याच्या मनांतून पार कोठच्या कोठें मावळवून टाकले. जगन्मातेचेंच एक दिव्य रूप अशा दृष्टीनें दामिनीकडे पाहणें आतां त्याला शक्य राहिलें नव्हतें. तसेंच स्वतःच्याच कल्पनास्वप्नांत दंग होऊन राहणें हेंही त्याला आतां साधत नाहींसें झालें होतें. दामिनीच्या पार्थिव सौंदर्याचा—जड-स्वरूपाचा इतका भयंकर पगडा त्याच्यावर बसला होता. त्याच्या अंतःकरणांत विश्वप्रेमाचे जे मधुर गुंजारव सतत भरून राहिलेले असत त्यांचें मधुरत्व वाढविणारें जणुं एक साधन अशी आतां पूर्वीप्रमाणें दामिनी राहिली नव्हती उलट ते सारे मधुर गुंजारवच आतां तिच्या भोंवतीच्या सौंदर्यप्रकाशाचा केवळ एक भाग होऊन राहिले होते.

दामिनीला आतां माझी कांहींच गरज राहिली नव्हती. ही एक लहानशी गोष्ट मला वाटतें येथें सांगून टाकली पाहिजे. आतां ती मला कांहीं काम सांगत नाहींशी झाली. माझ्याबरोबरचे जे दुसरे आणखी कांहीं सोबती तिच्या फावल्या वेळांत तिची करमणूक करायला पूर्वी उपयोगी पडत असत त्यांपैकीं ती घार तर मरूनच गेली. मुंगुस पळून गेलें; आणि तें भिकारडें कुत्र्याचें पिलू, त्याच्या आरडण्या ओरडण्यानें स्वामीजींच्या शांततेचा भंग होतो या सबबीवर तें कुणालासें देऊन टाकण्यांत आलें होतें. अशा रीतीनें कांहीं कामधंदा उरला नाहीं, तसाच सहवासाचाही संभव संपला; त्यामुळें मी पुन्हां स्वामीजींच्या सभोंवारच्या घोळक्यांत येऊन पाहिल्याप्रमाणें बसूं लागलों. खरें म्हणजे तेथलीं तीं भजनें, तीं संभाषणें, प्रवचनें किंवा इतर सारे प्रकार या सगळ्यांची मला आतां अगदीं भयंकर किळस वाटूं लागली होती. तरी पण दुसरा कांहीं उद्योगच राहिला नव्हता मला.

६

सतीशच्या मनाची प्रयोगशाळा जगांतल्या कोणत्याही बाह्य नियमांना दाद देणारी नव्हती. एक दिवस आपल्या या प्रयोगशाळेंत मला नेऊन आधुनिक भौतिक शास्त्रें आणि प्राचीन तत्त्वज्ञान यांचा मारे मिलाफ घालून तो मला दाखवीत होता, तर्कबुद्धि आणि विकार यांची पण त्या शास्त्रांच्या मिलाफांत त्यानें खिचडी केलेली होती. अशा त्या ऐन वेळीं दामिनी एकदम धाडकन दार उघडून धांपा टाकीतच आंत आली आणि तिच्या तोंडून एकदम जणुं स्फोट झाला.

" चला, उठा, एकदम दोघेजण या पाहूं. हं जलदी. "

एकदम उडी मारून मी उभा राहून ओरडलों, "अग, पण काय आहे तरी काय भानगड ? "

" नवीनच्या बायकोनें विष खाल्लं आहेसं वाटतं आहे मला " ती म्हणाली.

नवीन हा आमचा एक शेजारी; आमच्या नित्याच्या भजनी मंडळीपैकीं एक; मोठा एकनिष्ठ शिष्य स्वामीजींचा दामिनीच्या मागून आम्ही मोठे धावंत पळतच गेलों. पण आम्ही तेथें पोचेतों नवीनच्या बायकोचा जीव गेला होता.

इकडून तिकडून जी कांहीं माहिती समजली तिच्यावरून आम्हांला जी थोडी फार सुसंगत अशी हकिकत तयार करतां आली ती अशी. आपली आई वारल्यावर नवीनच्या बायकोनें स्वतःची आईपोरकी धाकटी बहीण आपल्यापाशीं राहण्याला आणली होती. मुलगी होती मोठी सुरेख. आणि मागच्या खेपेस नवीनचा भाऊ घरीं आला त्या वेळीं त्याला तर ती इतकी कांहीं आवडली कीं तावडतोब त्यांचें लग्न करण्याचा बेतही ठरवून टाकण्यांत आला होता. यामुळें नवीनच्या बायकोच्या छातीवरची एक मोठीच धोंड उतरल्यासारखें झालें; कारण नवीनची जात फारच उच्च असल्यामुळें चांगलासा अनुरूप वर मिळविणें ही त्या जातींत फारच मुष्किलीची गोष्ट होती. थोड्याच महिन्यांनीं नवीनच्या भावाचें कॉलेजचें शिक्षण पुरें होणार होतें, त्या वेळीं त्यांचे लग्नाचा मुहूर्त पाहून ठेवला होता. पण दरम्यान आपल्या बहिणीला आपल्या नवऱ्यानें कुमार्गाला लावून भ्रष्ट केली ही

गोष्ट नवीनच्या बायकोच्या लक्षांत येऊन चुकली. तेव्हां त्यानेंच त्या बिचारीशीं तावडतोब लग्न केलें पाहिजे असा तिनें हट्ट घेतला—पण त्यासाठीं एवढा हट्ट धरून त्याची मनवळवणी करण्याची तशी कांहीं मोठी जरूर पडली नाहीं. नुकताच लग्नसंस्कार पार पडला होता; आणि लगेच नववधूच्या मोठ्या बहिणीनें विष घेऊन स्वत:ला तिच्या वाटेंतून दूर करून घेतलें होतें.

आम्हीं कांहीं करूं शकत नव्हतों. म्हणून आम्हीं तिघेही हळू हळू गेल्या पावलीं परत आलों. तों स्वामीजींच्या भोंवतीं रोजच्या प्रमाणेंच तो घोळका जमलेला दिसला. स्वामीजी भजन सांगत होते; आणि ती मंडळी म्हणत होती. नेहमींप्रमाणेंच स्वामीजी भावनोत्कट होऊन भजनांत अगदीं रंगून गेले होते; आणि त्याच भरांत पाहतां पाहतां त्यांनीं त्या मंडळीबरोबर नाचण्याचीही सुरुवात केली....

पूर्णिमेच्या आधींचा एखाद दुसरा दिवस होता तो. आमच्या गच्चीच्या एका कोपऱ्यावर चलटा* वृक्षाची एक फांदी ओंळंबलेली होती. तिच्या पानांची गर्द सावली तेथें पडलेली होती. त्या सावलीच्या एका टोकाला दामिनी विचारांत गढून जाऊन स्तब्ध बसली होती. तिच्या पाठीमागच्या बाजूला व्हरांड्यामध्यें सतीशच्या मागेंपुढें येरझारा चालू होत्या. मला रोजनिशी लिहिण्याचें नित्याचेंच वेड होतें. तशी रोजनिशी लिहिण्यांत मी माझ्या खोलींत एकटाच गर्क झालों होतों. खोलीचीं दारें सताड उघडींच होतीं.

त्या रात्रीं कोकिळ कांहीं झोपी जाईना; दक्षिण वाताच्या झुळुकेबरोबर हलून झाडांच्या पानांचा पण आवाज होत होता; आणि त्यांच्यावर विलसणारी ज्योत्स्ना जणुं त्यांना साथ देत स्मित करीत होती. हालणाऱ्या पानांमधून चंद्रप्रकाशाची जी चमक सरसरत होती ती म्हणजे पानांच्या आवाजामुळें आनंदित झालेल्या ज्योत्स्नेचें जणुं स्मितच होतें. सतीशच्या

---

*चलटा— एक सुंदर फळझाड. पावसाळ्याच्या आरंभीं याला पांढऱ्या रंगाचीं फुलें येतात. त्यांना मधुर वास असतो. फळ नारळाएवढें मोठें असतें. तें पावसाळाअखेर टिकतें; फळावरील टरफल आंबट असून तें खाण्याच्या उपयोगी पडतें. हें झाड कलकत्त्याकडे होतें.

अंतःकरणांत पण अशीच कांहीं तरी गडबड उत्पन्न झालेली असली पाहिजे. कारण फेऱ्या घालतां घालतां तो एकदम गच्चीकडे वळला आणि जाऊन दामिनीच्या जवळ उभा राहिला.

दामिनीनें चमकून वळून पाहिलें, आणि पदर डोक्यावर ओढून घेऊन तेथून जाण्यासाठीं म्हणून ती उभी झाली. इतक्यांत सतीशनें हांक मारली, "दामिनी!"

तत्क्षणीं ती जागच्या जागींच थबकली आणि दोन्ही हात जोडून अत्यंत नम्रतापूर्वक आणि काकुळतीच्या स्वरानें म्हणाली, "माझ्या गुरुराया, एक प्रश्न विचारूं का आपल्याला?"

कसला प्रश्न अशा अर्थानें सतीश नुसता तिच्याकडे पाहत राहिला. पण प्रत्यक्ष उत्तर असें त्यानें कांहीं दिलें नाहीं.

दामिनीच पुढें बोलूं लागली; "तुमच्या पंथाची ही रात्रंदिवस जी सारी धामधूम चालली आहे तिचा जगाला कांहीं खरोखर उपयोग आहे का हें मला सांगा. आजपर्यंत एका जीवाचा तरी तुम्ही खरा उद्धार करूं शकलां आहां का?"

हें ऐकून मी खोलींतून उठून येऊन व्हरांड्यांत उभा राहिलों.

दामिनीचें बोलणें चालूच होतें. "रोजच्या रोज तुमचा अखंड नाद चालला आहे कीं प्रेम, प्रेम, प्रेम पाहिजे मनुष्याच्या अंतःकरणांत म्हणून! या प्रेमभावनेचें अगदीं नागडें उघडें स्वरूप आज नाहीं तुमच्या प्रत्ययाला आलें? त्या प्रेमाला धर्माची ओळख नाहीं कीं कर्तव्याकर्तव्याची फिकीर नाहीं. तो पत्नीची आठवण ठेवीत नाहीं; भावाचा विचार करीत नाहीं, कीं कुटुंबाच्या पावित्र्याचें त्याला भान नाहीं. त्याला दयेची जाणीव नाहीं, विश्वास हा पदार्थ त्याला माहीत नाहीं, त्याला विनय मानवत नाहीं किंवा कसली लज्जाही वाटत नाहीं. असल्या या दुष्ट, निर्लज्ज, आत्मघातकी प्रेमाच्या नरकापासून मनुष्याला वाचविण्याचा कोणता मार्ग तुम्ही शोधून काढला आहे?"

मला कांहीं आतां राहवेना; मी ओरडूनच म्हणालों, "जरूर, जरूर आम्ही यावर मार्ग शोधून काढला आहे. आमच्या प्रांतांतून स्त्री-जातीची संपूर्ण

हकालपट्टी करण्याचा अद्‌भुत असा हा मार्ग असून त्याच्या योगानें आमचा प्रेमशोधनाचा मार्ग संपूर्ण सुरक्षित आणि निष्कंटक होणार आहे ! ”

माझ्या बोलण्याकडे एवढें सुद्धां लक्ष न देतां दामिनी सतीशला उद्देशूनच पुढें म्हणाली, “ तुमच्या गुरुमहाराजांपासून मला तर कसलेंही नवें ज्ञान मिळालेलें नाहीं. माझ्या बावरलेल्या चित्ताला एक क्षणभर सुद्धां शांतिची जोड त्यांना करून देतां आलेली नाहीं. अग्नीनें अग्नी कधींही शांत होणारच नाहीं. आपल्या शिष्यांना ज्या मार्गाला ते लावीत आहेत त्या मार्गानें त्यांना बेडरपणाही प्राप्त होणार नाहीं, आत्मसंयमही नाहीं आणि मनःशांति नाहींच नाहीं. आज ती गरीब बिचारी बाई मेली; तुमच्या या प्रेमरूपी डाकिणीनेंच तिचें सारें रक्त शोषण करून तिला ठार मारलें. तेथें तरी या खुनी डाकिणीचें हिडीस स्वरूप तुम्हांला नीट दिसून आलें कीं नाहीं ? म्हणून देवाशपथ, माझी तुम्हांला हात जोडून, पदर पसरून प्रार्थना आहे कीं या डाकिणीपुढें तुम्ही माझा बळी देऊं नका. तेवढया संकटामधून तुम्ही मला वांचवा; त्यांतून वाचविण्याला यापुढें कोणी समर्थ असलेंच तर ते एक फक्त तुम्ही आहां. ”

एक क्षणभर आम्ही तिघेही कांहीं न बोलतां स्तब्ध राहिलों. आजूबाजूची निस्तब्धताही इतकी मर्मभेदक झाली कीं रातकिड्यांचा जो किर्रर्र आवाज होत होता तो मूर्च्छनेच्या आवेगानें विवर्ण झालेल्या अंतराळाचाच रुदनस्वर आहे असा मला भास झाला.

या शांततेचा भंग प्रथम सतीशनें केला. तो म्हणाला, “ तर मग मी करावं तरी काय असं तुझं म्हणणं आहे दामिनी ? ”

“ तुम्ही माझे गुरु व्हा. मी दुसऱ्या कोणाचें कांहीं ऐकायला तयार नाहीं. माझा उद्धार करील असा कांहीं मार्ग—या तुमच्या चाललेल्या सांवळागोंधळाहून कांहीं तरी उच्च मार्ग तुम्ही मला दाखवा. माझा आणि माझ्या ठिकाणीं असलेल्या परमेश्वरी अंशाचाही नाश होईल असें कृपा करून होऊं देऊं नका. ”

सतीश एकदम ताठ उभा राहिला आणि गंभीर स्वरांत उद्गारला “ तथास्तु ”

दामिनीनें त्याच्यापुढें साष्टांग नमस्कार घातला. तिचें मस्तक जमिनीवर

टेकलेलें होतें. तशा त्या स्थितींस अत्यंत आदरपूर्ण भक्तिभावानें ती किती वेळ तरी पडून राहिली होती. आणि स्वतःशींच पुटपुटत होती, "स्वामिन्, मला तारा, मला तारा, पापांतून माझी मुक्तता करा."

७

आमच्या आसपासच्या जगांत पुन्हां एकदां अत्यंत प्रचंड धामधूम माजली; आणि वर्तमानपत्रांतून निंदेचें जणुं तुफान उसळलें. हें सर्व कशामुळें तर सतीशने पुन्हां एकवार मतांतर आणि पंथत्याग केला होता म्हणून.

अगदीं प्रथम धर्मबिर्म सर्व कांहीं झूट आहे, आणि सामाजिक रूढि-बंधनांना काडीचीसुद्धां किंमत नाहीं अशीं मतें तो मोठ्या आवेशानें पुकारीत असे. पुढें तितक्याच आवेशानें देवदेवता, संस्कार आणि झाडून सारें कर्मकांड यांच्यावर तो श्रद्धा व्यक्त करूं लागला. आणि आतां अखेरीस आस्तिक आणि नास्तिक, धार्मिक आणि धर्मरहित असा दोन्ही पंथांचा फापटपसारा कचऱ्याप्रमाणें पार झुगारून देऊन तो सगळ्यांतूनच निवृत्त झाला होता. इतकी कांहीं निर्भेळ शांतता त्यानें पत्करली होती कीं त्याची श्रद्धा आहे कशावर आणि नाहीं कशावर यांचा कोणालासुद्धां कांहीं थांगपत्ता लागणें शक्य झालें नाहीं. तो कांहीं निव्वळ आळसांत काळ घालवीत नव्हता हें खरें. पूर्वीच्याप्रमाणेंच लोकहिताचीं कामें तो करूं लागला होता. पण त्याच्या कार्यांत आतां पूर्वींचा तो चढाईचा आवेश राहिला नव्हता.

वर्तमानपत्रांनीं जिच्याबद्दल आपल्या जवळच्या होत्या नव्हत्या तेवढ्या निंदेचा आणि उपरोधिकतेचा अगदीं मनमुराद उपयोग करून घेतला अशी आणखी एक गोष्ट घडून आली होती. ती म्हणजे माझें आणि दामिनीचें लग्न होणार ही बातमी. खरोखर आमच्या या लग्नाच्या बुडाशीं कोणत्या गूढ गोष्टी होत्या हें पाहण्याची कोणालाच तितकीशी फिकीर वाटत नव्हती;

—आणि खरें पाहिलें तर कोणाला अशी फिकीर वाटण्याचें कारण तरी काय!

## प्रकरण ४ थें : : श्रीनिवास

### १

या ठिकाणीं पूर्वीं एक निळीचा कारखाना होता. पूर्वीं या ठिकाणीं जी भली मोठी इमारत होती त्या इमारतींपैकीं चार दोन पडक्या झडक्या खोल्या तेवढ्या आतां येथें शिल्लक आहेत. बाकी सर्व इमारत धुळीला मिळून गेली आहे. दामिनीचा अंत्यविधी आटोपून येत असतां या ठिकाणावरून आम्ही आलों. का कोण जाणे पण ही जागा माझ्या मनांत भरली आणि मी एकटाच त्या ठिकाणीं राहूं लागलों.

नदीकडून कारखान्याच्या फाटकापर्यंत येणारा जो रस्ता आहे त्याच्या दोन्ही बाजूला शिसवीच्या झाडांची रांग असून त्यांच्या फांद्यांची त्या रस्त्यावर जणुं एक कमानच उभारल्यासारखी झालेली आहे. फाटक जिथें होतें त्या ठिकाणीं भले मोठे दोन खांब उभे आहेत. त्यावरून त्या ठिकाणीं फाटक होतें एकवेळ, याची खूण पटण्यासारखी आहे. आणि घराभोंवतालच्या बागेच्या पलीकडे सभोंवार जें कुसूं होतें तें पण मधून मधून कोठें कोठें उभें आहे. पूर्वीच्या जमान्याची आठवण करून देणारें आणखी एकच चिन्ह त्या ठिकाणीं आहे. तें म्हणजे त्या कारखान्यांतल्या कोणा मुसलमान कामगाराच्या थडग्यावरील विटांचा चबुतरा. त्याला तरी ठिकठिकाणीं चिरा पडल्याच आहेत. व त्यांमधून रानटी फुलांचीं झाडोरीं वाढलेलीं आहेत. त्यावरील फुलांना बहर आला आहे; लग्नाच्या दिवशीं नवरदेवाला आनंदी करवल्या कुमारिकांच्या थट्टेनें नको नकोसें करीत असतांना जशा हंसून मुरकुंड्या वळतात तशी या फुलांची अवस्था झालेली दिसते आहे; आणि या हास्याच्या भरांत मृत्यूला जणुं तीं वांकुल्या दाखवीत आहेत, त्याची रेवडी उडवीत आहेत असा भास होतो आहे. बागेंतील लहानग्या तलावाच्या दगडी बाजू आंत कोसळून गेलेल्या आहेत. त्यामुळें पाणी सगळें बाहेर झिरपून जाऊन तळ उघडा पडला आहे, आणि त्या जागीं एक कोथिंबिरीचा चांगला वाफा तयार होऊन राहिलेला आहे. बाहेर रस्त्यावर शिसवीच्या झाडांच्या त्या कमानीखालीं, सावलींत मी

बसलेला असलों म्हणजे फुलाला आलेल्या कोर्थिंबिरीचा वास माझ्या मेंदूचा काना–कोपरासुद्धां व्यापून टाकून माझें डोकें जणुं काय उठवून टाकीत असतो.

असा बाहेर झाडाखालीं मी बसलेला असलों म्हणजे माझ्या मनांत विचारचक्र चालू होतें. वाटतें कीं पहा, हाच कारखाना घ्या. आज त्याचे जे अवशेष दिसताहेत ते रस्त्याच्या कडेला पडलेल्या एखाद्या मेलेल्या प्राण्याच्या हाडांच्या सांपळ्याप्रमाणें जरी दिसत असले तरी एका काळीं तो चांगला जिवंत होता. त्या वेळीं त्याच्यामधून सुखदुःखांच्या लाटावर लाटा एकामागोमाग मोठ्या अहमहमिकेनें उत्पन्न होऊन वाहात होत्या आणि त्या लाटांना जणुं कधीं अंत येणारच नाहीं असें वाटत होतें. कारखान्याचा तो इंग्रज मालक; त्याची कर्तृत्वशक्ति केवढी भयंकर दांडगी होती; त्याच्या कारखान्यांत आंगचा घाम गाळून राबणाऱ्या शेतकऱ्यांचें रक्तसुद्धां कारखान्यांतल्या निळीप्रमाणेंच काळेंनिळें करून टाकणारा हा इसम माझ्यासारख्या यःकश्चित् माणसाशीं तुलना करून पाहतां केवढा प्रचंड माणूस म्हटला पाहिजे. तरीपण त्याच्यापुढेंसुद्धां धरणीमातेनें कच खाल्ली नाहीं. आपली हरिततृणांकुरित शाल चांगली कसून घेऊन तो कारखानदार आणि त्यानें मांडलेला तो पसारा यांनीं स्वतःच्या ठिकाणीं निर्माण केलेली सारी ओंगळ घाण झाडून सारवून साफ करण्याच्या कामाला ती लागली. आणि हें सारवून साफ करण्याचें तिचें काम तिनें इतकें पक्कें करायचा प्रयत्न केला कीं, त्या घाणीधुणीचा उगीच कोठें पुसट भाग जो राहिला आहे तो फक्त एकदोन सफाईचे हात दिले कीं पार कोठच्या कोठें नाहींसा होऊन जाईल !

अर्थात् हा माझा विचार म्हणजे कांहीं अगदीं नवा असा माझा शोध नव्हे—मलाच कांहीं हा विचार पहिल्या प्रथम स्फुरला असें नव्हे हें खरें; परंतु माझें मन केवळ याच विचारांत गुंगून राहत असे असें नव्हे. उलट, माझें मन अशा विचारांना जोरानें विरोधच करी. " छे छे ! " मला वाटे, "एक दिवस जाऊन त्याच्या जागीं दुसरा दिवस जो उजाडतो तो सडासंमार्जन करून आदल्या दिवशींची घाण साफसूफ करण्यासाठीं केवळ नव्हे. तो कारखान्याचा इंग्रज मालक, आणि त्यानें निर्माण केलेली ती सारी घाण

काळानें जणुं मूठभर धुळीसारखी उडवून पार कोठच्या कोठें नाहींशी करून टाकलेली आहे हें खरें आहे—पण माझी दामिनी ? ”

माझें म्हणणें पुष्कळांना पटणार नाहीं हें मला ठाऊक आहे. लोक म्हणतील कीं, शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानांत कोणाचाच कसला अपवाद केलेला नाहीं. त्यांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें हा सगळा संसार म्हणजे निव्वळ माया आहे, कमलदलावरील थरथरणाऱ्या जलबिंदूप्रमाणें तो क्षणभंगुर आहे; पण त्याचें असें आहे कीं शंकराचार्य होते संन्यासी. “ का ते कान्ता, कस्ते पुत्रः ” असे जे त्यांनीं प्रश्न केलेले आहेत, त्यांचा खरा अर्थच त्यांना समजलेला नव्हता. मी कांहीं असा संन्यासी नाहीं. त्यामुळें माझी दामिनी म्हणजे कांहीं कमलदलावरील क्षणजीवी नाशिवंत जलबिंदू नाहीं हें मला चांगलें समजूं शकतें.

यावर कोणी कोणी म्हणतात कीं, शंकराचार्यांच्या मतासारखें मत कित्येक संसारी गृहस्थाश्रमी लोकही धारण करीत असतात म्हणून. शक्य आहे. कारण असे हे लोक म्हणजे निव्वळ गृहस्थाश्रमी असतात; नाहींशी झालेली असते ती केवळ त्यांची गृहस्वामिनी असते, घरधनीण असते. अशा लोकांचें घर म्हणजे खरोखरच निव्वळ माया म्हटलें पाहिजे; आणि तशीच त्यांच्या त्या घराची मालकीण पण. त्यांचें घर आणि घरमालकीण म्हणजे दोन्ही त्यांनींच आपल्या हातानें मांडलेला खेळ होय; त्याचें काम आटोपलें कीं त्यांतून मागें जें काय उरेल तें झाडून टाकायला कसलीही केरसुणी घेतली तरी सारखीच.

अशा लोकांच्याप्रमाणें पट्टीचा गृहस्थाश्रमी बनण्याइतका दीर्घकाळ घर करून राहलो,—संसाराचा मांड मांडून राहलो मला मिळालेलें नाहीं हें एक; आणि माझा स्वभाव संन्याशाच्या वृत्तीचा नाहीं हें दुसरें; त्यामुळें मी अशा या लोकांच्या संसारी बाण्यापासून बचावलों. त्यामुळें मी माझी केलेली दामिनी ही माझी निव्वळ घरधनीणही मला वाटूं लागली नाहीं किंवा निव्वळ मायाही वाटूं लागली नाहीं. अखेरपर्यंत दामिनी ही दामिनीच—आणि माझी दामिनी—अशीच मला राहिली. अशा तिला निव्वळ छाया म्हणण्याची कोणाची छाती आहे !

माझ्या घराची मालकीण एवढीच जर माझी दामिनीबद्दल समजूत

असती तर ही जी गोष्ट मी लिहिली–आहे त्यांतलें फारसें कांहीं मी लिहिलेंच नसतें. परंतु तिचा आणि माझा संबंध याहून किती तरी उच्च प्रकारचा, याहून किती तरी यथार्थ आणि सात्त्विक ऐक्याचा असल्याचा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे. आणि म्हणून कोण काय म्हणेल याची एवढी सुद्धां पर्वा न बाळगतां मी सगळें कांहीं अगदीं जशाचें तसें लिहून ठेवण्याला प्रवृत्त झालों आहें.

लोक सामान्यपणें संसारात राहतात त्याच प्रकारानें माझ्याही नशिबांत दामिनीबरोबर राहण्याचें जर आलें असतें तर मग लोकांप्रमाणेंच आंघोळपाणी, खाणेंपिणें, झोपबिप या रोजच्या घरगुती व्यवहारावर माझेंही समाधान झालें असतें. मग दामिनीच्या मृत्यूनंतर ( माझी कुणी एखादी काकी मामी अथवा माझ्या मायेची कुणी आजीबाई माझ्याकडे येऊन माझें मन वळवूं पाहत असतां मीही एक उसासा टाकून शंकराचार्यांप्रमाणेंच गंभीरपणें " हूं ! हा मायेचा संसार किती विचित्र आहे !" ( संसारोयमतीव विचित्रः ) असा उद्गार, तिची ती संसाराच्या वैचित्र्याचा आणखी एक नमुना दाखविण्याची सूचना मोठ्या तत्परतेनें आणि जलदीनें मान्य करण्याकडे मन ओढत असतांही, काढण्याला कमी केलें नसतें. परंतु जुन्या जोड्यांत पाय जसा रुळावा तसा मी अजून संसाराशीं रुळलों नव्हतों. अगदीं प्रथमपासूनच सुखाची आशा मी सोडून दिलेली होती–छे ! छे ! असें म्हणणें अगदींच कांहीं तरी होय. इतका कांहीं अगदीं अमानुष किंवा माणुसकीविहीन मी बनलेलों नव्हतों. सुखाची तीव्र लालसा मलाही होती. पण दुसऱ्याकडून आपला तो एक हक्कच अशा रीतीनें जबरदस्तीनें तें वसूल करण्याची माझी वृत्ति नव्हती.

तुम्ही म्हणाल असें कां ? कारण असें कीं माझ्याशीं लग्न करण्यासाठीं दामिनीचें मन मीच मोठ्या प्रयत्नानें वळविलें होतें. सनईच्या मंजुळ भावनोद्दीपक निनादानें वातावरण दुमदुमून गेलें आहे. मंगल विवाहगीतांनीं कान भारून गेले आहेत, सारा मंडप दीपज्योतींनीं प्रकाशित झालेला आहे. अशा वेळीं अंतरपाट दूर झाल्यावर वधू–वर परस्परांचें प्रथम मंगल निरीक्षण करतात तसा कांहीं आमच्या लग्नाचा प्रकार झालेला नव्हता.

तर आम्ही अगदी दिवसाढवळ्या, डोळे चांगले स्वच्छ उघडे ठेवून जाणून बुजून विवाहबद्ध झालेले होतों—

## २

लीलानंद स्वामी महाराजांना सोडून निघाल्यानंतर आतां पुढें निवाऱ्याला राह्यचें कुठें आणि पोटापाण्याची वगैरे सोय काय आणि कशी पाह्यची हा प्रश्न आमच्यापुढें सहजच येऊन उभा राहिला. स्वामीजींच्या-बरोबर जेथें जेथें आम्ही जात असूं तेथें तेथें त्यांचे भक्तगण आमच्यावर जो आगतस्वागताचा आणि सरबराईचा मारा करीत असत त्यामुळें आम्हांला कुटें कांहीं उणें तर पडतच नसे; उलट जास्ती होऊन अजीर्ण होण्याचीच पाळी आमच्यावर आलेली होती. संसारी गृहस्थ म्हणून वावरायचें असलें तर राह्यला घर मिळवतां आलें पाहिजे, किंवा बांधतां आलें पाहिजे किंवा निदान भाड्यानें तरी घेतां आलें पाहिजे ही गोष्ट आमच्या कोणाच्या विचारांत सुद्धां कधीं येत नव्हती. कारण आमची घराची सोय करण्याची जबाबदारी सर्वस्वीं दुसऱ्यावर टाकण्याचें आतां अगदीं पुरेपूर आमच्या आंगवळणीं पडलें होतें. आणि आम्हांला असें वाटूं लागलें होतें कीं घर लोकांनीं आम्हांला द्यायचें हें लोकांचें काम आणि अशा घरांत आपल्या सगळ्या सुखसोई अगदीं ऐतोबाप्रमाणें उपभोगावयाच्या एवढें आमचें काम.

विचार करतां करतां अखेरीस आम्हांला आठवण झाली. जगमोहनबाबूंनीं घरामधील आपला हिस्सा सतीशच्या नांवानें करून ठेवला होता. त्यांचें तें मृत्युपत्र सतीशच्या हातामध्यें जर ठेवायला दिलेलें असतें तर त्याच्या भावसमुद्राच्या लाटांवर आपटून एखाद्या कागदाच्या होडीसारखा त्याचा केव्हांच नाश होऊन गेला असता. पण नशीब आमचें कीं तें मृत्युपत्र माझ्याजवळ होतें; कारण त्या मृत्युपत्राचा व्यवस्थाअधिकारी मला नेमण्यांत आलेलें होतें. जगमोहनांच्या या देणगीला या मृत्युपत्रांतच तीन अटी घातलेल्या होत्या आणि त्या पुऱ्या करून घेण्याची जबाबदारी व्यवस्था अधिकाऱ्यावर होती. त्या घरांत कसलाही धार्मिक विधि किंवा संस्कार होतां कामा नये ही पहिली अट. घराचा

खालचा मजला शेजारच्या चांभार लोकांच्या मुलांच्यासाठीं शाळा काढण्या-करितां म्हणूनच फक्त उपयोगांत आणावयाचा ही दुसरी अट. आणि सतीशच्या मृत्यूनंतर ही सारी मिळकत या चांभारांच्या समाजाच्या हिता-साठीं देऊन टाकावयाची ही तिसरी अट. धार्मिकपणाचें नांव काढलें कीं जगमोहन बाबूंच्या पायाची आग मस्तकाला जात असे. प्रापंचिक वृत्ती-पेक्षांही ही धार्मिक प्रवृत्ति माणसाला जास्त अपवित्र आणि भ्रष्ट करणारी आहे असेंच जणुं त्यांना वाटे. आणि मृत्युपत्रामध्यें आपल्या थट्टेखोर वृत्तीला अनुसरून त्यांनीं ज्या " आरोग्यरक्षणार्थ सावधगिरीच्या सूचना " म्हणून नमूद केल्या होत्या त्यांचा उद्देश घराच्या बाकीच्या भागांत उतास आलेल्या धार्मिकतेपासून आपलें घर अलिप्त ठेवावें हाच मुख्यतः होता.

म्हणून मग मी सतीशला म्हणालों, " चला आपण तुझ्या कलकत्त्यां-तल्या घरांतच राहायला जाऊं. "

" अजून हें करण्याइतकी माझ्या मनाची तयारी झालेली नाहीं " सतीशनें उत्तर दिलें.

तो काय म्हणतो हेंच मला ध्यानांत येईना. हें पाहून त्यानें जरा खुलासा केला. तो म्हणाला, " एक काळ असा होता कीं त्या वेळीं माझी फक्त बुद्धीवर श्रद्धा होती. पण अखेरीस जीविताचा सारा भार एकटी बुद्धीच कांहीं उचलूं शकत नाहीं असेंच माझ्या अनुभवास आलें. त्यानंतर एक काळ असा आला कीं त्या वेळीं मी सर्वस्वी भावनेवर भर दिला. पण भावना म्हणजे एक अगाध, अशेय महासागरच आहे, एक जिचा तळ कधींच गांठतां येणार नाहीं अशी खोल अंधारदरी आहे असें माझ्या निदर्शनाला आलें. याचें कारण ज्या बुद्धीचा किंवा ज्या भावनेचा आधार घेऊन मी राहूं पाहत होतों त्या दोन्ही शक्ति केवळ माझ्याच ठिकाणच्या शक्ति होत्या. पण मनुष्याचें केवळ आपल्याच आधारावर राहून भागणें शक्य नाहीं. म्हणून माझ्याहून वेगळा असा कांहीं तरी आधार मला सांपडेपर्यंत मी कलकत्त्यास जाऊं शकत नाहीं. "

" मग तुझा विचार काय आहे ? " मी विचारलें.

" तुम्ही दोघे कलकत्त्यास घरीं राहायला जा. मी स्वतः कांहीं काळपर्यंत असाच एकटा भटकंती करावी म्हणतों. ज्या ठिकाणीं मला पोंचायचें आहे,

त्या ठिकाणचा किनारा आतां माझ्या दृष्टिपथांत आल्यासारखा मला वाटतो आहे. या वेळीं जर तो मी दृष्टिआड होऊं दिला तर पुन्हां तो माझ्या हातीं लागण्याची आशाच नको. ”

आमची दोघांचीच जरा एकीकडे गांठ पडतांक्षणींच दामिनी म्हणाली, “ हें असलं कांहीं जमायचं नाहीं, हे जर असे एकटेच भटकायला लागले तर त्यांना काय हवं काय नको कोण सारं पाहणार ? मागें एकदम अशीच लहर येऊन भटकायला गेली होतीच कीं स्वारी. त्या वेळीं परत येते वेळीं काय अवस्था झाली होती त्यांची, नाहीं आठवत तुम्हाला ? हा विचार नुसता मनांत आला तरी भीतीनें मला कांपरें भरतें. ”

सांगून टाकूंच का तुम्हांला अगदीं खरें खरें ? गांधील माशीनें कडकडून चावा घेतल्यावर जशा वेदना होतात तशा वेदना सतीशबद्दलची दामिनीच्या मनांतली ही काळजीची वृत्ति पाहून माझ्या अंतःकरणाला झाल्या. जगमोहन बाबूंच्या मृत्यूनंतर सबंध दोन वर्षेपर्यंत सतीश नुसता भटकतच नव्हता का ? काय झाली होती धाड त्यामुळें त्याला. कांहीं जिव नाहीं गेला त्याचा त्यांत ! हा जो विचार माझ्या मनांत आला तो बोलून दाखविण्याशिवाय कांहीं मला राहवलें नाहीं. एवढेंच नव्हे तर बोलून दाखवितांना माझ्या अंतःकरणांतील वेदनेचें विषही त्यांमध्यें थोडेंसें उतरलेंच होतें.

“ मला ठाऊक आहे श्रीविलास बाबू ” दामिनी म्हणाली, “ मनुष्य उगीच अशा तऱ्हेनें मरत नाहीं. मरायला त्याला फार मोठे हाल सहन करावे लागतात. पण आपण दोघेजण चांगली धडधाकट त्यांना मदत करायला समर्थ असतांना त्यांना आपण असा त्रास पडूं द्यावाच का मुळीं ? ”

आम्हीं दोघेजणें ! त्यापैकीं एक द्वितीयांश म्हणजे हा मी, गरीब बापडा श्रीविलास ! बाकी जगाचा हा न्यायच आहे म्हणा, कीं कोणाचा तरी त्रास वांचविण्यासाठीं दुसऱ्या कोणाला तरी त्रास सहन करायला लागायचा ! पृथ्वीवरील सगळ्या रहिवाशांचे असे हे दोन स्पष्ट वर्गच पाडतां येतील. या दोन वर्गोपैकीं मी कोणत्या वर्गात मोडत होतों हें दामिनीनें चांगलें ओळखलें होतें. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट ही कीं तिनें आपल्याला स्वतःलाही त्याच वर्गात समाविष्ट करून घेतलें होतें.

म्हणून मग सतीशकडे जाऊन मी म्हणालों, " कांहीं हरकत नाहीं. तर मग कलकत्त्यास जाण्याचा बेतच तूर्त आपण रद्द करूं या. नदीकांठच्या त्या पडक्या घरांत कांहीं दिवस काढतां येतील आपल्याला. लोक म्हणतात म्हणे कीं त्या घरांत कांहीं भुतेखेतें अधूनमधून संचार करतात म्हणून. पण तें एक परी बरेंच आहे. त्यामुळें तेथ भेटीला कोणी चिटपाखरूं सुद्धां फिरकायचें नाहीं आणि त्रास व्हायचा नाहीं."

" आणि तुम्हीं दोघे ? " सतीशनें विचारलें.

" तेथल्या त्या भुतांच्या प्रमाणें आम्हीं शक्य तितकें अदृश्य राहूं. "

सतीशनें दामिनीकडे जरा बिचकतच दृष्टिक्षेप केला. त्याच्या नजरेंत कसली तरी भयंकर भीति भरल्यासारखा भास झाला.

दोन्ही हात जोडून दामिनी म्हणाली, " मी आपल्याला माझे गुरु केलें आहे. माझ्या हातून यापूर्वी काहींही अपराध घडले असले तरी तेवढ्यासाठीं मला आपल्या—माझ्या आपल्या सेवेच्या हक्काला अंतरूं देऊं नका.

३

कबूल केलें पाहिजे मला कीं, सतीशनें एकप्रकारच्या माथेफिरू चिकाटीनें हा जो साध्य साधनेचा प्रयत्न चालविलेला होता त्याचा खरा अर्थ आणि स्वरूप ध्यानांत येणें माझ्या बुद्धीच्या आवांक्याबाहेरचें आहे. एक काळ तर असा होता कीं, अशा प्रकारच्या नुसत्या कल्पनेचीच मीं पार टवाळी उडवून दिली असती. पण आतां या गोष्टींना हंसायचा मी बंद झालों होतों. आतां मला कळून चुकलें होतें कीं सतीश कांहीं एखाद्या रात्रींच्या भुताच्या कोलीतामागें लागलेला नव्हता; तर त्याला खऱ्याखुऱ्या अग्नीच्या तेजाच्या शोधाची ओढ लागलेली होती. त्या अग्नितेजाच्या धगीनें तो कसा भाजून जळून चालला होता हें मला दिसूं लागल्यावर जगमोहनबाबूंच्या पंथामधले ते शिळे मुद्दे माझ्या तोंडून बाहेरच पडेनासे झाले. कारण हर्बर्ट स्पेन्सरच्या म्हणण्याप्रमाणें धर्मभावनेचा उगम कुठल्या तरी भुताखेतांवरच्या अंध श्रद्धेमधून झाला असला पाहिजे, हें मत प्रतिपादून किंवा धार्मिकतेच्या शिकवणुकीचें तर्कशास्त्रदृष्ट्या अस्वाभाविकपण सिद्ध करून आतां काय उपयोग होता ? सतीशचें अंतरंग नुसतें

पेटून धगधगत होतें. त्याचें सर्व शरीर अंतर्बाह्य एक प्रकारच्या आगीनें कसें होरपळत होतें हें आतां आम्ही प्रत्यक्षच अनुभवीत होतों ना ?

गुरुमहाराजांच्या सानिध्यांत गायन, नर्तन, भजन, गुरुसेवा वगैरेंच्या एका ठराविक चक्रांत जेव्हां सतीशचे दिवस जात होते तेव्हांच त्याची अवस्था थोडी जास्त सुखाची होती असें म्हटलें असतां चालेल. तेथल्या त्या वेळोवेळीं कराव्या लागणाऱ्या कार्यक्रमामध्यें त्याचा सारा आध्यात्मिक आवेशाचा पूर ओसरून जात असे. इथें आतां त्याला बाह्यतः शांतता प्राप्त झाली होती. कसल्याही कार्यक्रमाची धडपड त्याच्या पाठीशीं नव्हती; पण त्यामुळें तर त्याच्या अंतःप्रवृत्तीला, अंतःशक्तीला आवर घालणें अशक्य होऊन बसलें. नुसत्या भावभक्तीच्या, प्रेमभावनेच्या उद्रेकावर समाधान होण्याची गोष्टच त्याच्या बाबतींत शिल्लक राहिली नाहीं. आत्मसाधनेसाठीं त्याची इतकी कांहीं अचाट धडपड त्याच्या अंतःकरणांत चालू झाली होती कीं आम्हांला त्याच्याकडे पाहण्याचा सुद्धा धीर होत नाहींसा झाला.

शेवटीं माझ्याच्यानें बोलल्यावांचून कांहीं राहवेना. म्हणून एक दिवस मी त्याला सुचविलें, " सतीश, तूं एखादा चांगलासा गुरु कां पाहत नाहींस ? असा गुरु तुला कांहीं नीट मार्ग तरी दाखवील आणि तुझी आध्यात्मिक प्रगति अधिक सुलभतेनें होईल असें नाहीं तुला वाटत ? "

पण यामुळें उलट त्याला मनःस्तापच झाला. "जाऊं दे विश्री ! एक शब्द सुद्धां बोलूं नकोस बघूं " तो चिडूनच ओरडला, " माफ कर आणि कांहीं कांहीं बोलूं नकोस. आध्यात्मिक प्रगति करून काय मिळायचें आहे कुणाला ? मोहाच्या मायेचा मार्गच तेवढा सुलभ असूं शकतो. सत्याचा मार्ग नेहमींच खडतर असायचा. "

तरीही मी माझा मुद्दा सोडला नाहीं. मीं म्हटलें " तरी पण सत्याच्या मार्गावरच का होईना, पण तुला कुणी नीट वाट दाखविणारा गुरु असला तर अधिक बरें नाहीं का ? "

सतीश जणुं बेभानच झाल्यासारखा झाला, एवढ्यानें तो गुरगुरत म्हणाला, " कसला रे मार्ग दाखवायचा ? मी कांहीं या पृथ्वीवरचें एखादें

अज्ञात ठिकाण शोधण्यासाठीं धडपडत नाहीं हें तुझ्या टाळक्यांत कधीं कधीं शिरायचें नाहीं का? मी ज्या माझ्यासाठींच केवळ असलेल्या अशा सन्मार्गानें जात असेन त्यांत माझ्याबरोबर जर कुणी येणार असेल तर एक फक्त माझा हृदयस्थ परमात्मा. गुरूच्या शोधार्थ हिंडत राहिलों तर फक्त गुरुगृहाच्यापर्यंतच प्रगति व्हायची; पुढें नाहीं."

याच सतीशच्या तोंडून किती परस्परविरोधी तत्त्वें मी ऐकलीं असतील! हाच मी श्रीविलास, जगमोहनबाबूंचा पट्टशिष्य--त्यांना जर मी स्वामी किंवा गुरुजी म्हणून हांक मारली असती तर त्यांनीं एक भला मोठा सोटा घेऊन मला झोडूनच काढलें असतें. त्या मला याच सतीशनें लीलानंद स्वामी महाराजांचे पाय चेपायला प्रत्यक्ष लावलें होतें. आणि या गोष्टीला आतां एक आठवडासुद्धा पुरता होऊन गेला नव्हता तोंच त्यानें मला हा असा नवा उपदेश करायला पाहावें! पण हंसण्याची कांहीं माझी छातीच नव्हती. तेव्हा मी अगदीं गंभीरपणें गप्प राहिलों.

सतीशच पुढें बोलत राहिला. "आमच्या धर्मग्रंथांत जें सांगितलें आहे कीं 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' तें का याचा आतां मला चांगला उलगडा झालेला आहे, इतर वाटेल ती वस्तु दुसऱ्यापासून उसनी किंवा बक्षीस म्हणून घेऊन चालेल. पण मनुष्याचा धर्म हा जर त्याचा स्वधर्म नसेल तर अशा धर्मापासून त्याचें रक्षण तर होणारच नाहीं. उलट त्यामुळें त्याचा नाशच होईल. मला माझ्या परमेश्वराची प्राप्ति व्हायची असलीच तर ती मला स्वतः त्यासाठीं प्रयत्न करून त्याला जिंकूनच करून घ्यावी लागेल. पण अशी स्वप्रयत्नानें जर ही सिद्धि होणार नसेल तर त्यापेक्षां मग मरण पुरवलें."

माझा स्वभाव पडला जात्याच वावदूक. जेव्हां असा येे म्हटल्या मी त्याला थोडाच हार जाणार होतों? म्हणून मीं म्हटलें, "अरे जो खरा कवि असेल, तो आपल्या अंतःकरणामधून काव्य प्रसवूं शकेल. पण जो खरोखर कवि नसेल त्याला काव्य कोणाकडून तरी उसनेंच घ्यायला हवें."

"मी खरा कवि आहे" सतीशनें जरासुद्धां न कचरतां उत्तर दिलें.

अर्थात् इथें हा सगळा वादच संपला. मी आपला तिथून निघून आलों.

सतीशची जेवण्याची किंवा झोंपण्याची वेळ अमुक अशी कांहीं नेमलेली नव्हती. आतां तो एक या ठिकाणीं असला तर पुढच्या क्षणीं त्या अथवा दुसऱ्या अमुक ठिकाणींच तो असेल हें सांगणें अशक्य होतें. वाजवीहून पातळ धार दिलेल्या सुरीचें पातें आहे किंवा नाहीं इतकें सूक्ष्म होऊन जातें तशा प्रकारचा सूक्ष्म पातळपणा त्याच्या शरीराच्या ठिकाणीं येऊं लागला. हें असें फार दिवस चालूं शकणार नाहीं हें कुणाच्याही ध्यानांत येऊं लागलें. तरी पण त्याच्या भानगडींत पडण्याचें धाडस कांहीं मला होईना. दामिनीला मात्र हा प्रकार सहन करणें अशक्य होऊन गेलें. परमेश्वराच्या वर्तनाचा तिला भयंकर संताप येऊन गेला. हा कसला देवाघरचा न्याय ! देवाचे जे अस्तित्वच मानीत नाहींत त्यांच्यापुढें या देवाचें कांहींमुद्धां चालत नाहीं. अशा स्थितींत जो इतका निष्ठापूर्वक आपल्या पदरीं लीन झाला त्याची अशी प्राणांतिक अवस्था करणें हें परमेश्वर झाला म्हणून त्याला शोभतें काय ? असें तिच्या मनांत येऊं लागलें. पूर्वीं लीलानंद स्वामींच्यावर दामिनी गरम होत असे तेव्हां त्यांना वळणावर कसें आणावें हें तिला चांगलें साधत असे. पण आतां होता प्रसंग या परमेश्वराशीं. तेव्हां आपल्या रागाचा झटका कसा काय अनुभवाला आणून द्यावा याचा कांहींच मार्ग त्या बिचारीला ठाऊक नव्हता !

पण त्यांतल्या त्यांत शिकस्त करून सतीशचें जेवणें खाणें नेमल्या वेळीं व्हावें असें होईलसें ती करी. त्या बेशिस्त प्राण्याला आमच्या या संसारी नियमबंधनाशीं जुळतें वागायला लावण्यासाठीं ती ज्या युक्त्या योजीत असे त्या मोठ्या चतुराईच्या आणि हिकमतीच्या असत. ही जी तिची धडपड चालू असे तिला पुष्कळ काळपर्यंत सतीशनें साक्षात विरोध असा दाखविला नाहीं. पण एक दिवस तो जो निघाला तो थेट नदीकिनारीं गेला आणि नदीचें उथळ पात्र ओलांडून पलीकडच्या तीरावरील वाळूच्या मैदानांत गेला आणि तिथून दूर कुठें दिसेनासा होईपर्यंत निघून गेला.

इकडे सूर्य डोक्यावर आला. हळुहळू त्याची चाल पश्चिम क्षितिजाकडे चालू झाली. पण सतीशचा कांहींच कुठें पत्ता नाहीं. दामिनी त्याची

वाट पाहत तशीच उपाशी राहिली होती. शेवटीं इतका उशीर झाला कीं, तिच्याच्यानें कांहीं धीर धरवेना. ताटांत तिनें चार जिन्नस वाढून घेतले आणि तें ताट घेऊन त्या गुडघ्याएवढ्या खोल पाण्यांतून ती तशीच कशीबशी पलीकडे जाऊन त्या वाळूच्या मैदानांत जाऊन पोंचली.

केवढें अफाट पसरलेलें होतें तें वाळूचें मैदान. आणि दूरवर कुठें एक चिटपाखरूंसुद्धां नजरेला येत नव्हतें. ऊन तर काय नुसतें मी म्हणत होतें. आणि वाळूंतून उष्णतेच्या झळा ज्या एकामागून एका मारीत होत्या त्यांची प्रखरता वरच्या उन्हाहूनही जास्त भयंकर दाह करणारी होती. त्या झळा म्हणजे जणुं दबा धरून बसलेले तेथल्या त्या निर्जनतेचे रखवालदारच होते. अशा त्या वालुकामय मैदानाच्या एका टोकाला उभी राहून दामिनीनें जेव्हां पाहिलें कीं, जिकडे तिकडे सूर्यप्रकाशाच्या तापानें विवर्णता आलेली आहे, कुणाला किती हांका मारल्या तरी ओ म्हणून मिळायची सोय नाहीं, किंवा कांहीं प्रश्न विचारला तर उत्तर द्यायला जवळपास कुणी माणूस नाहीं, तेव्हां तिचा होता नव्हता तो सगळा धीर खचून गेला. तिला वाटलें जणुं कांहीं सारी सृष्टीच पार कुठच्या कुठें नाहींशी होऊन गेली असून सृष्टिपूर्व अशी ती निर्गुण निराकार रंगहीन अफाट पोकळीच आपल्यापुढें पसरली आहे कीं काय ? जिकडे पाहावें तिकडे तिला अभावाचेंच संपूर्ण साम्राज्य पसरलेलें दिसूं लागलें. कुठें आवाज नाहीं, कुठें हालचाल नाहीं, कुठें रक्ताचा तांबडेपणा नाहीं, कुठेंही हिरवळ नाहीं, आकाशाचें निळेपणही कुठें नाहीं; जिकडे पाहावें तिकडे ती रखरखीत विवर्ण वाळू. ती पाहून एक वेळ हा कुणा राक्षसाचा ओठ वगैरे कांहीं नसलेला दांत विचकणारा जबड्याचा सांगाडाच आपल्यापुढें उभा आहे असा तिला भास झाला, आणि आंत जीभ नसलेला तो जबडा आ वासून वरच्या निर्दय निळ्या आकाशाकडे तहानेनें व्याकूळ होऊन पाण्याची याचना करीत सदासर्वकाळ जणुं उभा राहिलेला आहे, अशी चमत्कारिक भीतिदायक कल्पना तिच्या मनांत येऊन गेली.

कोठच्या बाजूनें गेलें म्हणजे सतीश सांपडेल असा क्षणभर ती विचार करीत होती तोंच तिला पावलाच्या अस्पष्ट खुणा दिसून आल्या त्या वाळूत. त्या खुणांच्या मागानें ती तशीच किती वेळ तरी त्या मैदानांतल्या

खाचखळग्यांमधून पुढें पुढें जात राहिली आणि शेवटीं एका वाळूच्या ढिगाऱ्याच्या पलीकडच्या बाजूला एक पाण्याचा लहानसा डोह होता त्याच्यापाशीं जाऊन ती थांबली. कारण पायाच्या खुणा तेथून पुढें दिसत नाहींशा झाल्या. त्या झऱ्याच्या कांठांवर आर्द्र झालेल्या वाळूमध्यें अगणित बदकांच्या पावलांच्या खुणांच्या नाजुक रांगाच रांगा उमटलेल्या होत्या आणि वाळूच्या ढिगाऱ्याच्या बाजूला सावली होती त्या सावलींत सतीशाची स्वारी बसलेली होती.

तेथलि तें पाणी म्हणजे निळयांत निळया रंगाचा जणुं अर्कच होता. त्यामध्यें पाणलव्यांच्या नाचऱ्या पिल्लांनीं मोठी धामधूम चालविलेली होती. केव्हां आपली लांब चोंचच पाण्याच्या वर काढावी, तर केव्हां शेपटी वर उडवावी तर केव्हां आपले काळे पांढरे गंगाजमनी पंखच फड-फडावे असा त्यांचा सारखा खेळ चाललेला होता, पलीकडे थोड्याच अंतरावर एक रानटी बदकांचा तांडा होता. क्वॅक, क्वॅक अशी त्यांची एकसारखी ओरड चाललेली होती. आणि चोंचीनें पंख साफ करण्याचा असा कांहीं सपाटा त्यांचा सुरू होता कीं, यांचे पंख त्यांच्या मनाजोगे कधींतरी साफ होणार आहेत कीं, नाहीं याचाच पाहणाराला संशय पडावा. दामिनी त्या डोहाच्या कांठावरील वाळूच्या ढिगाऱ्यावर जेव्हां जाऊन उभी राहिली तेव्हां तर त्या बगळ्यांनीं एकदम मोठीच आरड-ओरड केली आणि पंख फडफडावीत तेथून पळ काढला.

सतीशनें वळून पाहिलें तों दामिनी त्याच्या नजरेस पडली. “ इथें कशाला आलीस तूं ? ” तो तिच्यावर खेंकसला.

“ आपल्याला थोडंसं खायला घेऊन आलें आहे मी.” दामिनी म्हणाली.

“ मला कांहीं नको आहे. ” सतीश म्हणाला.

“ पण आतां किती उशीर झाला आहे— ” भीतभीतच दामिनी बोलूं लागली.

“ कांहीं नाहीं उशीर झाला ” सतीश पहिल्याच ताठ्यांत म्हणाला.

“ तर मग मी थोडा वेळ इथेंच थांबते. कांहीं वेळानें मग— ” दामिनीचें बोलणें पुरें न होऊं देतांच सतीश एकदम उसळून म्हणाला,

" अरेच्या, कां पण तूं अशी— " परंतु दामिनीच्या चेहऱ्यावर नजर जातांच सतीश एकदम मध्येंच बोलायचा थांबला.

दामिनीनें तोंडांतून एक शब्दसुद्धां काढला नाहीं. तें ताट तसेंच हातांत घेऊन आल्या पावलीं ती वाळू तुडवीत परत आली. साऱ्या बाजूला पसरलेली ती अथांग वाळू रात्रींच्या अंधारांत चमकणाऱ्या वाघाच्या डोळयांप्रमाणें दाहक आणि भयप्रद वाटली तिला.

दामिनीच्या डोळयांत अश्रू फारच क्वचित् पाहायला मिळायचे. विजेसारखे जाज्वल्य कटाक्ष फेंकण्याचीच तिच्या डोळयांना अधिक संवय होती. पण त्या दिवशीं संध्याकाळीं मी तिला बघितली तेव्हां ती जमिनीवरच पाय पसरून बसलेली होती आणि रडत होती. मला पाहतांक्षणीं तिच्या अश्रूंच्या ओघाच्या आड आलेला एखादा बंधारा फुटावा त्याप्रमाणें तो प्रवाह पुरासारखा वाहूं लागला. हें पाहून माझ्या हृदयांत कशा प्रकारची कालवाकालव झाली हें शब्दांनीं मला सांगतां येणार नाहीं. हळुहळू तिच्याजवळ मी गेलों आणि तिच्या शेजारींच एका बाजूला बसलों.

तिचा रडण्याचा आवेश जरा कमी झाल्यावर मीं म्हटलें, " सतीशच्या तब्येतीची तुला इतकी फिकीर कां वाटते ? "

माझ्या म्हणण्याचा रोख ध्यानांत न येऊन भोळया भावानें तिनें विचारलें,

" तर मग त्यांच्या दुसऱ्या कशाची बरं मी काळजी करावी ? बाकीच्या ज्या साऱ्या गोष्टी आहेत त्यांचा विचार सगळा त्यांचा त्यांनाच करायला हवा. मला त्यामध्यें कांहीं कळत नाहीं आणि माझा त्या बाबतींत कांहीं उपयोग नाहीं. "

" पण विचार कर दामिनी, " मी म्हणालों,

" माणसाचें मन जेव्हां आपलें सर्व सामर्थ्य एखाद्या विशिष्ट विषयाच्या ठिकाणीं केंद्रित करतें त्या वेळीं इकडे त्याच्या शरीराच्या गरजा त्या मानानें कमी होत असतात. म्हणूनच आत्यंतिक आनंदाच्या किंवा आत्यंतिक दुःखाच्या प्रसंगीं माणसाला तहान किंवा भूक यांची आठवण देखील राहत नाहीं. सतीशच्या मनाची आतां अशा प्रकारची अवस्था

झालेली आहे कीं, त्याच्या शरीराकडे तूं मुळींच लक्ष दिलें नाहींस तरी त्याला कांहींसुद्धां व्हायचें नाहीं."

"पण मी आहे स्त्री" दामिनीनें उत्तर दिलें, "आमच्या शरीराच्या किंवा प्रसंगीं आमच्या प्राणांच्याही साह्यानें दुसरें शरीर वाढविणें, जोपासणें हा आमचा धर्म आहे. शरीर ही स्वतः स्त्रीनें निर्माण केलेली वस्तु आहे. म्हणून शरीराला कष्ट होत आहेत असें पाहिलें कीं स्त्रीच्या मनाला केव्हांही समाधान व्हायचें नाहीं."

"आतां आलें माझें ध्यानांत" तिला टोमणा देण्यासाठीं मीं म्हटलें, "तुम्ही बायका या अशा नुसत्या शरीराच्या संरक्षक. त्यामुळेंच तर निर्गुण परमात्म्याच्या पाठीमागें लागलेल्या लोकांची नजरच तुमच्याकडे केव्हां फिरकत नाहीं."

"नजर फिरकत नाहीं म्हणतां?" दामिनी उसळून म्हणाली. मला तर उलट असें वाटतें कीं, त्यांची नजर इतकी अद्‌भुत असते कीं साऱ्या जगांत ती नुसता प्रलय माजवून टाकते."

मी मनांतच म्हणालों, "अस्सं काय बाईसाहेब! अशा दृष्टीचा तुम्हांला मोह पडलेला आहे नव्हे! बेट्या श्रीविलासा, या जन्माची तुझी कथा संपली, पण पुन्हां जेव्हां जन्माला येशील बाबा तेव्हां अशा या प्रलयाच्या राज्यांत, गोंधळाच्या राज्यांत जन्म घे बाबा!"

४

त्या दिवशीं सतीशनें त्या वाळूच्या मैदानावर दामिनीच्या हृदयावर जी जखम केली तिचा एक मोठा परिणाम झाला. त्या वेळीं दामिनीच्या डोळ्यामध्यें जें तीव्र दुःख सांठविलेलें सतीशच्या प्रत्ययाला आलें तें कांहीं त्याला आपल्या मनांतून दूर करतां येईना. त्याचें विस्मरण कांहीं त्याला होईना. त्यामुळें त्या पुढच्या कांहीं दिवसांत आपण दामिनीकडे विशेष लक्ष पुरवितों, तिच्या मनाप्रमाणें वागतों असें दाखवून एकप्रकारचें प्रायश्चित्तच त्याला घ्यावें लागलें. अलीकडे कितीक दिवसपर्यंत तो तिच्याशीं मन मोकळें करून बोलला नव्हता. आतां तो तिला आपण होऊन हांक मारून बोलावून घेऊं लागला आणि तिच्याशीं गप्पा मारीत बसूं

लागला. आपल्या आध्यात्मिक साधनेमध्यें येत असलेले अनुभव व करावे लागणारे झगडे याबद्दल बहुतेक या साऱ्या गप्पा चालत असत.

आजपर्यंतच्या त्याच्या उपेक्षेनें दामिनीच्या मनाला कधीं जड वाटलें नसेल इतकें जड त्याच्या अलीकडच्या या आपल्याविषयींच्या कळकळीमुळें तिला वाटूं लागलें. कारण तिला हें पक्कें ठाऊक होतें कीं हें असें फार दिवस कांहीं टिकून राह्यचें नाहीं. कारण त्यासाठीं द्यावी लागणारी किंमत फारच अवास्तव मोठी होती. या बाबतींतला एकंदर हिशेब केव्हां ना केव्हां तरी सतीशच्या ध्यानांत येणारच. आणि मग आपल्याला केवढी मोठी किंमत द्यावी लागत आहे हें दिसून आलें कीं हा सगळा डोलारा ताबडतोब जमीनदोस्त होणार. इकडे जों जों सतीश चांगल्या गृहस्थाश्रमी माणसाला शोभेल अशा रीतीनें जेवणखाण वगैरेच्या वेळांच्या बाबतींत जास्त जास्त नियमितपणा दाखवूं लागला तों तों दामिनीला जास्त जास्तच काळजी वाटूं लागली आणि स्वतःची जास्त जास्त लाजही वाटूं लागली. हा सगळा नियमितपणा सोडून देऊन सतीश पुन्हां एकदां आतां बंड करील तर किती बरें होईल असें तिला होऊन गेलें. एकसारखें ती आपल्या मनाशीं "तुम्ही आपले दूर होतां तेंच बरें होतें. तुम्ही माझ्याबद्दल इतकी काळजी दाखवितां खरी; पण त्यामुळें तुम्ही स्वतःलाच शिक्षा करून घेतल्यासारखें होतें, पण हें तर मला मुळींच सहन होत नाहीं" असें म्हणत असावीसें दिसूं लागलें. शेवटीं तिनें आपल्या मनाचा निर्णय केलासें दिसलें कीं "तें काहीं नाहीं; याला आतां एकच उपाय, पुन्हां शेजारणीपाजारणींशीं मैत्री जोडायची म्हणजे तरी हे घरांतून दूर राहतात कीं नाहीं, पाहिलें पाहिजे."

एक दिवशीं रात्रीच्या वेळीं, 'श्रीविलास' 'दामिनी' अशा एकाएकीं मोठमोठ्यानें हांका मारलेल्या ऐकून आम्ही जागे झालों. त्या वेळीं मध्यरात्र उलटून गेलेली असली पाहिजे. अर्थात् किती वाजले ही गोष्ट सतीशच्या गांवींही नसावी. तो रात्रीं काय करीत असे आणि रात्री कशा घालवीत असे हें आम्हांला माहीत नव्हतें. पण त्याच्या एकंदर वागणुकीमुळें साऱ्या भूत-पिशाचांनीं सुद्धां तेथून पार पळ काढल्यासारखें दिसत होतें.

झोपेंतून जागे होऊन डोळे चोळीत आपापल्या खोल्यांमधून आम्ही दोघे जण बाहेर आलों तों घरापुढील आंगणांतल्या फरशीवर सतीश

एकटाच अंधारांत उभा होता. आम्हांला पाहतांच तो मोठ्यानें ओरडला, " सगळें ज्ञान झालें आहे मला; सर्व कांहीं कोडें सुटलें. कसलाही संशय आतां राहिला नाहीं. "

दामिनी पाय न वाजवितांच पुढें झाली आणि फरशीवरच बसली. सतीशनें शून्य मनानें तिचेंच अनुकरण केलें आणि तोही खालीं बसला. अर्थात् गाड्याबरोबरच्या नळाप्रमाणें मलाही तोच मार्ग अनुसरावा लागला.

सतीश बोलूं लागला, " परमेश्वर ज्या दिशेनें माझ्याकडे येत आहे त्याच दिशेनें जर मी जात राहिलों तर मग त्याच्यापासून मी दिवसानुदिवस जास्त जास्त दूरच जात राहीन. मी जर त्याच्याविरुद्ध दिशेनें मार्ग क्रमूं लागलों तरच आमची भेट होऊं शकेल. "

सतीशच्या तळपत्या डोळ्यांकडे मी नुसता पाहतच राहिलों. भूमितीशास्त्रप्रमाणें पाहतां त्यानें मांडलेला सिद्धांत अगदीं निरपवाद होता. पण त्याच्या बोलण्याचा एकंदर रोख तरी काय होता ? हा माझ्यापुढें मोठा कठिण प्रश्न होता.

सतीश पुढें बोलूं लागला.

" परमेश्वराला सगुण शरीराची आवड आहे. म्हणूनच तो पुन्हां पुन्हां सगुण शरीर धारण करून पृथ्वीवर अवतार घेत असतो. पण केवळ सगुण शरीरावरच विसंबून आपलें माणसाचें जीवन चालूं शकणार नाहीं. त्यासाठीं आपल्याला परमेश्वराच्या निर्गुणत्वाकडेच जाण्याचा मार्ग अनुसरला पाहिजे; परमेश्वर स्वतः आहे बंधरहित, गुणातीत म्हणून त्याला बंधनांचा, सगुणांचा खेळ सुचतो नि आवडतो. आम्ही माणसें बंधनयुक्त, सगुण आहोंत. त्यामुळें स्वातंत्र्यांत, बंधनरहितत्वांत, निर्गुणांत आपल्या मनाला खरा आनंद प्राप्त होतो. हें आम्हांला नीट कळत नाहीं याच्या पोटीं आमचें सारें दुःख जन्म घेत असतें. "

आकाशांतल्या ग्रहांप्रमाणें आम्ही अगदीं स्तब्ध राहिलों. तोच पुढें म्हणाला,

" मी काय म्हणतों आहे तें तुझ्या ध्यानांत नाहीं वाटतें आलें दामिनी ? तूं संगीताचें उदाहरण ध्यानांत घे. स्वतः गायक जो असतो तो आपल्या अंतःकरणांतलि आनंदामधून स्वरच निर्माण करण्यांत रंगतो; तर आपण जे

ऐकणारे असतों ते त्या स्वरांच्या अनुरोधानें तशा प्रकारच्या आनंदोप-भोगापर्यंत जाऊन पोंचतों. एक जण, म्हणजे गायक, अनिर्बंध स्थितींतून बंधनयुक्त अवस्थेमध्यें प्रवेश करतो; तर दुसरा, म्हणजे ऐकणारा बंधनयुक्त अवस्थेमधून अनिर्बंध स्थितीकडे जातो. त्या दोघांचें मीलन, त्या दोघांचा एकजीवपणा होण्याचा मार्ग हा एवढाच एक आहे. परमेश्वर आणि मानव यांच्या संबंधांतही हें असेंच आहे. परमेश्वर हा गायक आणि मानव हा ऐकणारा. तो गाऊं लागला म्हणजे आम्हां मानवांभोंवतीं बंधनें निर्माण करतो. आणि आम्ही जों जों त्याच्या संगीताशीं समरस होतों तों तों तीं तीं बंधनें आम्ही तोडून टाकतों."

सतीश जें कांहीं बोलत होता त्याचा अर्थ दामिनीला समजला होता कीं नाहीं हें नाहीं मला सांगतां येणार. पण सतीशचें अंत:करण ती चांगलें ओळखून होती. म्हणून दोन्ही हात मांडीवर जोडून ठेवून ती अगदीं स्तब्ध राहिली.

बोलत होता सतीशच पुढें. तो म्हणाला, "आज रात्रभर मी असाच हा परमेश्वराचें तें मधुर गीत ऐकत बसलों होतों, तों एकाएकीं झटक्यासरसा हा सारा उलगडा मला झाला. मग मला दम धरवेना. केव्हां एकदां हें कुणाला तरी मी सांगतों असें मला होऊन गेलें. म्हणून मीं तुम्हांला हांक मारली. आजपर्यंत सारा वेळ मी परमेश्वराचें ध्यान माझ्या मानवी सगुण शरीराशीं जुळेल अशा स्वरूपांत करण्याची धडपड करीत होतों. पण त्यामुळेंच मला त्याचा साक्षात्कार होईना. 'हे प्रलयस्वरूपा, विनाशका, बंधमोक्षका प्रभो! माझे राईराईएवढे तुकडे होऊन ते तुझ्या ठिकाणीं विलीन होवोत, पुन:पुन्हा, अनंत काळपर्यंत हें असें घडत राहो. हीं बंधनें माझ्यासाठीं नाहींत; माझ्या कामाचीं नाहींत; म्हणूनच कोणत्याही बंधनाला मी फार काळ चिकटून राहूं शकत नाहीं. हीं सारीं बंधनें तुझीं आहेत; तूं निर्माण केलेलीं आहेत; म्हणूनच तूं या सगुण सृष्टिनिर्मितीच्या कार्याला अनंत काळपर्यंत जुंपलेला राहतोस. तर मग तुझा हा आमच्या सगुण मानवी शरीराशीं चाललेला खेळ खुशाल असाच चालू राहूं दे; आणि मला तुझ्या निर्गुणत्वांत बुडी घेण्याचें सामर्थ्य दे. हे अनंत, तूं सर्वस्वीं माझा

आहेस, माझा आहेस, माझा आहेस—" असा घोष करून त्या अंधारांतच सतीश नदीच्या रोखानें चालता झाला.

त्या रात्रींच्या प्रसंगानंतर सतीश पुन्हां आपल्या पूर्वींच्या पदावर येऊन वागूं लागला. आतां पुन्हां त्याला तहान, भूक किंवा विश्रांति यांचें भान राहत नाहींसें झालें. अर्थात् त्याचें मन ब्रह्मानंदाच्या उच्च स्थितीला केव्हां पोंचेल आणि निराशेच्या खोल गर्तेत केव्हां सांपडेल याचा कांहीं नेम कोणाला सांगतां येण्यासारखा नव्हता. 'अशा या प्राण्याला सांसारिक यम-नियमांच्या सुखकर बंधनांत ठेवण्याचा भार जिनें आपल्या शिरावर घेतलेला होता त्या बिचारीचें परमेश्वरच रक्षण करो...' असें म्हणण्यावाचून मला कांहींच इतर इलाज नव्हता.

५

सारा दिवसभर ऊष्म्यानें कसें अगदीं गदमदून गेलें होतें. रात्रीं मोठें सोसाट्याचें वादळ झालें. आमच्या वेगळ्या वेगळ्या खोल्यांच्या पुढच्या बाजूला एक सलग असा व्हरांडा होता. त्यामध्यें रात्रभर दिवा तेवता ठेव-लेला असे. तो त्या सोसाट्यांत विझून गेला होता. नदीच्या पाण्याच्या लाटा वादळासरशीं मोठ्या झपाट्यानें वर उसळून किनाऱ्यावर सपाटा मारीत होत्या. इतक्यांत आभाळांत एकदम गडगडाट होऊन, ढग फुटून खालीं धूमधार पाऊस कोसळूं लागला. त्या ठिकाणीं जणुं प्रळयकाळचें तांडव नृत्यच चालू झालें. एका बाजूला खालच्या त्या सपाटा मारणाऱ्या लाटा आणि वरच्या बाजूला कोसळणारा तो मुसळधार पावसाचा घोर वर्षाव यांच्या संघर्षांत जणुं कांहीं एक प्रकारची झांजेची साथच त्या तांडव नृत्याला होत होती. त्या गडद अंधाराच्या अथांग पोकळींत चाललेल्या हाल-चालींचे आवाज जरी कानठळ्या बसविण्याइतके प्रचंड होते तरी पण त्या अंधारांत त्या हालचाली दृष्टिगोचर मात्र मुळींच होत नव्हत्या. अंधारा-मुळें अंतराळाची पोकळी—आकाश सुद्धां भीतीनें थरथर कांपणाऱ्या आंधळ्या पोरासारखें भासमान होत होतें. एखाद्या राक्षसीचें जवळचें कोणी माणूस गमावल्यामुळें तिनें किंचाळी फोडावी तशासारखा आवाज बांबूंच्या बेटांतून येत होता. आंबराईतून मोडून पडणाऱ्या किंवा वाऱ्याखालीं वाकणाऱ्या

फांद्यांचा, कडकड, कर्रर्र, धाडधाड अशा प्रकारचा आवाज वर उठत होता. नदीच्या बाजूला मातीचे ढिगारेच्या ढिगारे कोसळून त्यांचा धप्पधप्प असा आवाज होत होता. आमच्या चंद्रमौळी पडक्या घराच्या मोकळ्या फटींतून झंझावाताचे थंडगार, झोंबणारे झोत आंत घुसून एखाद्या वेडावलेल्या हिंस्र पशूप्रमाणें घुमत होते.

रात्रीच्या अशा समयाला मनुष्याच्या मनाचे सारेच बंध जणुं तडातड तुटून पडतात. त्यांच्या अंतरंगांतही त्या तुफानाचा संचार होतो आणि मग तें तुफान तेथें मन मानेल तसें थैमान घालून साराच अनर्थ माजवून टाकतें. त्या ठिकाणीं रूढि आणि शिष्टसांप्रदाय यांच्या हरतऱ्हेच्या बैठकींच्या वस्तूंचा जो मांड मांडलेला असतो तो पार इकडे तिकडे अस्ताव्यस्त फेंकून दिला जातो; आणि सभ्यपणाच्या मर्यादांचा पडदा पार उडवून टाकला जाऊन त्याच्या आड असलेल्या साऱ्या क्षोभकारक गोष्टी भर चव्हाट्यावर मांडल्यासारख्या होतात. अशा त्या वेळीं मला कांहीं झोप येईना. पण त्या झोपेविना डोळे ताठलेल्या स्थितींत माझ्यावर विचारांचा जो प्रचंड हल्ला आणि मारा सुरू झाला त्याबद्दल मी तुम्हांला कांहींही कसें सांगू ? कारण त्या विचारांचा या आपल्या गोष्टींशीं कांहीं संबंध नाहीं.

इतक्यांत एकाएकीं " कोण आहे तें ! " असें सतीश त्या अंधारांत ओरडून बोलल्याचें माझ्या कानावर आलें.

" मी आहें ती—दामिनी " उत्तर आलें. तुमच्या खोलीच्या खिडक्या उघड्या आहेत आणि पावसाचें पाणी सारखें आंत घुसतें आहे. म्हणून खिडक्या बंद करायला आलें होतें मी."

ती त्या खिडक्या लावून घेत होती तोंच सतीश अंथरुणावरून उठून दूर झाल्याचें तिनें पाहिलें. थोडा वेळ हो कीं नाहीं अ । विचार करीत तो तसाच उभा राहिला आणि मग खोलीमधून बाहेर निघून गेला.

दामिनी आपल्या खोलीपाशीं जाऊन दाराशीं उंबरठ्यावरच किती वेळ तरी बसून राहिली. पण कोणी परत आलेलें तिला आढळलें नाहीं. तुफानाचा वेग मात्र एकसारखा वाढतच चालला होता.

आतां दामिनीला अधिक वेळ स्वस्थ बसवेना. ती पण घरांतून चालती झाली. त्या झंझावातामध्यें पायावर धड ताठ उभें राहणें देखील अशक्य

होऊन गेलेलें होतें. प्रलयकालीन मैफलीमध्यें दंग झालेल्या देवांचे रख-वालदार जणुं दामिनीला एकसारखें रागें भरून, दटावून, पुनःपुन्हां मागें रेटीत होते. पावसाचा तर, अंतराळाचा कानानूकोपरा व्यापून टाकण्याचा जणुं जिवावर उदार होऊन प्रयत्न चालू होता. त्या जलप्रलयाच्या प्रवाहाच्या वेळींच दामिनीला आपल्या अंतःरंगांतील दुःखाच्या आवेगाला बाहेर वाट फोडून देतां आली असती तर तिला केवढें तरी हलकें वाटलें असतें. पण तेंही तिच्या नशिबीं नव्हतें.

एकाएकीं विजेचा भयंकर कडकडाट होऊन या टोकापासून त्या टोका-पर्यंत आकाश फाटल्यासारखें झालें. त्या प्रकाशांत सतीश नदीच्या अगदीं काठावर उभा असलेला दिसून आला; जिवाचा एक अगदीं तेगार करून दामिनीनें एवढा प्रचंड झपाटा मारला कीं त्या झंझावातावरही मात करून ती सतीशजवळ जाऊन पोंचली. त्याच्या पुढें तिनें लोटांगण घातलें आणि एवढ्यानें ओरडून बोलली कीं, तिच्या आवाजाखालीं त्या प्रलय मारुताचाही आवाज पार दडपून गेला. ती म्हणाली, " तुमच्या पायांची शपथ घेऊन मी सांगते कीं तुमच्या परमेश्वराचा कोणताही अपराध कर-ण्याचा, त्याच्या राज्यांत कोणतेंही पाप करण्याचा माझ्या मनांत विचार नव्हता. मग अशी क्रूर शिक्षा तुम्हीं मला काय म्हणून करतां ? "

सतीश एक शब्दही न बोलतां उभा राहिला.

" माझी धोंड तुमच्या मार्गामध्यें नको असेल तर तुमच्या पायांनीं अश्शीच मला नदीमध्यें लोटून द्या. पण इथें उभे राहूं नका. अशा यावेळीं तुम्हाला घरीं परत गेलेंच पाहिजे. "

सतीश परत आला. घरांत पुन्हां प्रवेश करतांना तो म्हणाला, " ज्याची मी साधना करतों आहे त्या परमेश्वराची माझ्या जीवनाला अतिशयच मोठी गरज आहे—ही गरज इतकी पराकाष्ठेची आणि सर्वव्यापी आहे कीं या जगांत मला इतर कशाची गरज उरलेली नाहीं. म्हणून दामिनी माझ्यावर दया कर आणि मला माझ्या परमेश्वरापाशीं एकटा सोड, त्याच्या संपूर्ण हवालीं कर. "

दामिनी एक क्षणभर स्तब्ध राहिली आणि मग म्हणाली, " ठीक आहे. तसंच करीन मी. "

## ६

प्रत्यक्ष त्यावेळीं मला त्यांतलें कांहींच ठाऊक नव्हतें. दामिनीनें मला पुढें ही सारी हकिकत सांगितली. त्यामुळें त्या रात्रीं बाहेरून परत येऊन व्हरांड्यांतून आपल्या खोलीकडे जाणाऱ्या दोन आकृति मी माझ्या खोलीच्या उघड्या दारामधून पाहिल्या त्या वेळीं माझ्या नशिबांतील भेदक शून्यतेच्या भारानें माझें हृदय पार दडपून गेलें आणि घशांत श्वास अडकून मला कसें गुदमरल्यासारखें झालें. तसाच धडपडत मी अंथरुणावर उठून बसलों. त्या रात्रीं मग डोळ्याला डोळा लागणें ही अशक्यच गोष्ट होती.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दामिनीकडे नजर रोखून मी पाहतों तों काय ती तिची अवस्था ! आदल्या रात्रींच्या तुफानांतील सैतानी तांडवनृत्यानें त्या बिचाऱ्या अनाथ बालिकेवर केलेल्या अत्याचारांच्या एकूणएक खुणा तिच्या सर्वांगभर उठून दिसत होत्या. काय प्रकार घडला होता याची जरी मला काडीची कल्पना नव्हती तरी पण मला सतीशचा फारच भयंकर राग आला होता.

"श्रीविलासबाबू" मला पाहून दामिनी म्हणाली, "मला कलकत्त्यास घेऊन चालतां का ?"

हे शब्द उच्चारतांना तिच्या हृदयाची काय अवस्था झालेली होती, हें म्हणतांना तिला केवढें दिव्य करावें लागत होतें याची मला पुरेपूर कल्पना होती. म्हणून मी कां, कशाला, वगैरे कांहीं प्रश्न विचारले नाहींत. माझ्या अंतःकरणांतही तीव्र यातनांचें काहूर माजलेलें होतें. पण त्यांतच एका गोष्टीनें मला थोडेंसें हायसें वाटत होतें. इथून दामिनी निघून जाते आहे हें तिच्या हिताचेंच आहे हा विचार मला थोडा समाधानाचा वाटत होता. कारण खडकाशीं एकसारख्या धडका खात राहून खडक थोडाच फुटायचा आहे ? त्यांत तिचीच आयुष्यनौका फुटून तिचा चक्काचूर होणार हें ठरलेलें होतें.

दामिनीनें जातेवेळीं सतीशला नमस्कार करून त्याचा निरोप घेतला. जातां जातां त्याला ती म्हणाली, "आपल्या पायाशीं मी फार भयंकर गुन्हा केला आहे. आपण मला त्याबद्दल क्षमा कराल अशी आशा मी बाळगूं का ?"

नजर जमिनीवरच खिळलेली ठेवून सतीशनें उत्तर केलें; "माझेही

कांहीं कमी अपराध झालेले नाहींत. त्याबद्दल प्रायश्चित्त घेऊन मला त्यांच्या दोषांतून मुक्त होऊं दे. मगच मी क्षमेची हक्कानें मागणी करीन."

कलकत्त्याला आम्ही चाललों होतों. दामिनीच्या अंतःकरणांत पहिल्या-पासून आजपर्यंत सदैव केवढी सर्वदाहक आग उसळून पेटून राहिली होती याचा मला त्या वेळीं स्पष्ट प्रत्यय आला. त्या आगीच्या चटक्यांनीं मीसुद्धां इतका होरपळून निघालों कीं सतीशवर चांगलें भरपूर तोंडसुख घेतल्यावाचून मला राहवेच ना.

पण संतापाच्या आवेशात दामिनीनें मला गप्प राहा म्हणून बजावलें. "माझ्यापुढें या गोष्टी बोलायला तुम्हांला शरम कशी नाहीं वाटत?" ती ओरडायला लागली, "मला त्यांनीं केवढ्या मोठ्या खाईतून वांचविलें आहे याची तुम्हांला काय कल्पना! तुम्हांला फक्त माझें दुःख आणि कष्ट दिसतात. पण मला वांचविण्याकरितां त्यांना केवढ्या दुःखाच्या दिव्यांतून जावें लागत होतें हें बघायला तुम्हाला डोळेच नव्हते का? या चांडाळणीनें, काळसर्पिणीनें, साऱ्या शाश्वत स्वर्गीय रमणीयतेचा नाश करून टाकण्याची धडपड चालविली होती. या धडपडींत तिला लाथेची भली ठोकर बसली! चांगली खोडकी जिरली; अगदीं चांगलें प्रायश्चित्त मिळालें—" आणि आवे-शाच्या भरांत दामिनीनें मुठी वळवून आपली छाती जोरजोरानें बडवून घेण्याला सुरुवात केली. तिचे हात चांगले जबरदस्तीनें धरून ठेवून मला तिला थांबवावें लागलें.

कलकत्त्याला आम्ही संध्याकाळच्या सुमाराला पोंचलों. दामिनीला तिच्या त्या चुलतीकडे कां मावशीकडे मी उतरवली आणि मी माझ्या जुन्या चांगल्या ओळखीच्या एका खाणावळींत उतरायला गेलों. मला पाहून माझ्या ओळ-खीच्या सगळ्या मंडळींना चमकल्यासारखेंच झालें. "म्हणजे काय? तुम्ही आजारी बिजारी तर नव्हतां ना?" ते सगळे एकदम ओरडून विचारूं लागले.

दुसऱ्या दिवशींच टपालानें दामिनिकडून पत्र आलें. तिनें लिहिलें होतें, "मला इथून घेऊन जा. या घरांत माझ्यापुरेशी जागा नाहीं."

त्यांतली खरी गोष्ट अशी मग समजून आली कीं तिची ती चुलती का मावशी कोण होती ती तिला ठेवून घ्यायला तयार नव्हती. साऱ्या

शहरभर आम्हां मंडळीबद्दल कंड्यांचें वारेमाप पीक उसळलेलें होतें. आम्ही लीलानंद स्वामींना सोडून गेल्यावर थोड्याच अवधींत वर्तमानपत्रांचे नवरात्रांतील खास पूजा अंक निघालेले होते. त्या लोकांजवळ आमचा बळी देण्यासाठीं शस्त्रें जणुं पाजळून तयारच ठेवलेलीं होतीं अगदीं जय्यत. अष्टभुजा देवीला द्यायला या प्रसंगीं मंडळींना बळी पण मोठे नामांकित सांपडले होते. आमच्या शास्त्राप्रमाणें पशूमध्यें सुद्धां स्त्री जातीचा बळी देणें निषिद्ध ठरविलेलें आहे. पण आधुनिक काळच्या मनुष्य यज्ञांत स्त्री बळी मिळाला म्हणजे यज्ञ करणारांना जास्तच उत्साहाचें भरतें येतें असें दिसतें. अर्थात् दामिनीच्या नांवाचा प्रत्यक्ष उल्लेख करण्याचें मात्र सगळयांनींच मोठ्या कुशलतेनें टाळलें होतें. पण तितक्याच मोठ्या कुशलतेनें आपण हें खरोखर कोणाबद्दल लिहितों याबद्दल कोणी संशयसुद्धां उरूं दिला नव्हता. या हत्याकांडाचा इतर कांहीं परिणाम होवो किंवा न होवो, पण तिच्या मावशीच्या घरीं जागेचा संकोच होण्याला मात्र त्याचा उपयोग झाला होता.

दामिनीचे आईबाप आधींच वारलेले होते. पण तिचा एक भाऊ मात्र जिवंत होता अशी माझी कल्पना होती. म्हणून मी दामिनीला त्याचा पत्ता विचारला. पण त्याचा कांहीं उपयोग नाहीं म्हणून तिनें मान हलविली. "कारण" ती म्हणाली, "तीं माणसें अगदींच गरीब आहेत." खरी गोष्ट अशी कीं आपल्या भावाला उगीच अडचणींत टाकावें हें दामिनीला बरें वाटलें नाहीं. हो, कुणी सांगावें; तोही उद्यां म्हणाला कीं आपल्या घरीं पुरेशी जागा नाहीं, म्हणजे मग ?

"तर मग तूं राहणार तरी कुठें ?" मीं विचारलें.

"मी लीलानंद महाराजांकडे परत जाते."

थोडा वेळ एक शब्द तोंडांतून काढण्याचा मला धीर होईना. इतकें माझें मस्तक तिच्या या उत्तरानें भडकून गेलें. माझ्या आणि तिच्याही—नशिबीं दैवानें शेवटीं हा असा दुष्ट डाव लिहिलेला होता काय ? या विचारानें मी वेडावून गेलों.

"स्वामीजी तुला परत आपल्यापाशीं घेतील ?" शेवटीं एकदांचें मीं विचारलें.

"मोठ्या आनंदानें !"

दामिनीला पुरुषांच्या मनाची बरोबर जाणीव होती. मठस्थापना, पंथ-स्थापना, आणि बुवाबाजी करणारे जे लोक असतात त्यांना सत्यसंशोधना-पेक्षां अनुयायी पकडण्यांतच खरा आनंद होत असतो. तेव्हां दामिनीची कल्पना अगदीं बरोबर होती. लीलानंदांच्या परिवारांत मात्र तिला कांहीं जागा कमी पडल्याचा अनुभव आला नसता. परंतु—

अशा प्रकारचे विचार चालू असतां तिला स्वामीजींकडे जागा मिळ-ण्याला अडचण येणार नाहीं हा विचार मनांत येतांच मी तिला म्हणालों,

" दामिनी आणखी एक याला तोड आहे. रागावणार नाहींस तूं असें जर वचन देत असलीस तर मी सांगतों. "

" सांगाच तर मग " दामिनी म्हणाली.

" तुझ्या दृष्टीनें माझ्यासारख्या या असल्या क्षुद्र माणसाशीं लग्न कर-ण्याची कल्पना जर तुला थोडीशी जरी शक्य वाटत असेल तर—"

" काय, बोलतां आहां तरी काय श्रीविलासबाबू ? तुम्हांला वेड तर नाहीं लागलं ? "

" समज, लागलं आहे " मी म्हणालों. " न सुटणारीं कोडीं पुष्कळदां माणसाला वेड लागल्यावरच सुटत असतात. आरबी भाषेंतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टींमध्यें तूं ती मनांत येईल तेथें घेऊन जाणाऱ्या जादूच्या सतरंजीची गोष्ट वाचली आहेस ना ! तशीच अवस्था वेडाची आहे. माण-साच्या रोजच्या व्यवहारांत जे हजारों क्षुद्र प्रश्न माणसाला अडखळवीत असतात ते सारे अल्लद ओलांडून पलीकडे जायला माणसाला वेड समर्थ करीत असतें. "

" क्षुद्र प्रश्न म्हणून कशाला म्हणतां तुम्ही ? "

" उदाहरणार्थ, लोक काय म्हणतील ? पुढें आपलं कसं होईल ? वगैरे वगैरे. "

" या क्षुद्र विचारांचें राहूं द्या. पण दुसरे कांहीं अगदीं जिव्हाळ्याचे प्रश्न आहेत त्यांचें कसें काय ?

" जिव्हाळ्याचे प्रश्न म्हणजे तूं कशाला म्हणतेस ? " आतां माझ्या बाजूनें मीं तिला प्रश्न केला.

" उदाहरणार्थ हा एक प्रश्न घ्या. माझ्यासारख्या स्त्रीशीं लग्न केल्यानें तुमची पुढें काय अवस्था होईल ? " दामिनीनें उत्तर दिलें.

" हाच जर तुझा जिव्हाळ्याचा प्रश्न असेल तर मग मला भ्यायचें कांहीं कारण नाहीं. कारण आतां माझी जी अवस्था आहे त्याहून वाईट अवस्था माझी व्हायला आतां जागाच नाहीं. सध्यां माझ्या नशिबानें जमिनीवर अगदीं पार सपाट लोळण घेतलेली आहे. आतां त्याची कांहीं हालचाल व्हायची असली, पालथें पडलें आहे त्याचें तें नुसतें उलथें होणार असलें, तरी सुद्धां तें माझ्या आहे या अवस्थेंत सुधारणा होणार असल्याचेंच लक्षण आहे. "

अर्थात् माझ्या मनस्थितीबद्दल दामिनीला दिव्य मार्गानें कधीं कांहींच बातमी लागली नव्हती असें कांहीं मी खात्रीपूर्वक म्हणूं शकणार नाहीं. मात्र जी कांहीं बातमी लागलेली असेल ती अद्यापपर्यंत " महत्त्वाची " या सदराखालीं मात्र आलेली नसावी. निदान त्या बातमीकडे इतकेंसें लक्ष द्यावेंसें तिला कधीं वाटलें नव्हतें आजपर्यंत. पण आतां तर या बातमीच्या अनुरोधानें स्वतःचें प्रत्यक्ष धोरण आंखण्याचा तिच्यावर प्रसंग आला होता.

कांहींच न बोलतां दामिनी विचारांत गढून गेली.

म्हणून मीच म्हणालों, " दामिनी, जगांतल्या अगदींच सामान्य माणसांपैकीं एक माणूस मी आहें. कदाचित् तेवढी सुद्धां माझी लायकी नाहीं. कारण या जगांत चार चौघांत माझी कांहीं सुद्धां पत नाहीं. अशा स्थितींत माझ्याशीं लग्न केल्यानें अथवा न केल्यानें असं काय माझं मोठं भांडवल बुडणार आहे किंवा तरणार आहे कीं त्याबद्दल तुला एवढा विचार पडला आहे ? "

दामिनीच्या डोळ्यांवर अश्रुबिंदु चमकूं लागले. "तुम्ही जर खरोखरच सामान्य पुरुष असतां तर मला या बाबतींत एका क्षणाचाही विचार करावा लागला नसता. " ती म्हणाली.

पुन्हा बराच वेळपर्यंत ती स्तब्ध राहिली. आणि मग आपल्याशींच पुटपुटली, " मी कशा प्रतीची स्त्री आहें हें तुम्ही जाणतां. "

" आणि मी काय प्रतीचा माणूस आहें हें पण तूं जाणतेस " उत्तरादाखल मीही हळुच म्हणालों.

अशा रीतीनें विवाहयाचनेचा समारंभ पुरा झाला आमचा. तो करतांना बोललेल्यापेक्षां न बोललेल्या गोष्टींवरच आम्हां दोघांची अधिक भिस्त होती.

७

माझ्या वक्तृत्वानें भारून गेलेले पुष्कळ लोक पूर्वी कलकत्त्यामध्यें होते. पण मी कलकत्त्याहून निघून गेल्यावर पाठीमागें माझ्याबद्दलचें आकर्षण त्यांच्या ठिकाणीं बहुतेक शून्यावर आलें होतें. आमचा नरेंद्र तेवढा एक अजून असा प्राणी शिल्लक होता कीं ज्याला मी म्हणजे या आधुनिक युगामधला कोणी एक अत्यंत अलौकिक पुरुष वाटत होतों. त्याच्या मालकीचें एक घर तूर्त रिकामें होतें. तेथें आम्ही आपलें बिऱ्हाड थाटलें.

मी लग्नाची गोष्ट जेव्हां काढली तेव्हां सुरुवातीलाच ती मौनाच्या खड्ड्यांत दूर कोठें सादीकोपऱ्यांत अडगळींत पडल्यासारखी झाली होती. त्या खंदकांतून माझ्या त्या सूचनेची कधीं सुटका होईल असा कांहीं संभवच मला पहिल्या पहिल्यानें वाटेना. निदान एवढें खास, ती सूचना खड्ड्यांतून वर काढून ' होय ' किंवा ' नाहीं 'च्या हमरस्त्यावर आणून सोडायचें काम कांहीं उगीच घे म्हटल्या होण्यासारखें नव्हतें. त्याच्यासाठीं अनंत वादविवाद करावे लागणार आणि विचारविकारांच्या बांधकामाची बरीच मोडतोड आणि डागदुरुस्ती करावी लागणार असा माझा समज झाला होता.

पण असेंच म्हटलें पाहिजे कीं मानवी मनाची रचना करतांनाच, या मनाच्या आकस्मिक, अनपेक्षित टिंगलखोर वर्तनामुळें साऱ्या मानसशास्त्राची चांगली रेवडी उडावी असाच सृष्टिकर्त्याचा उघड उघड हेतु असावा. कारण आम्ही त्या ठिकाणीं बिऱ्हाड थाटल्यावर लगेच वसंत ऋतूनें आम्हांला गांठलें. आणि त्यामध्यें सृष्टिकार्याच्या आनंदमय हास्यानें आमच्या भाड्याच्या घराचा कोपरान कोपरा दुमदुमून गेला.

याच्या पूर्वी केव्हांच मी म्हणजे कोणी तरी एक व्यक्ति आहें हें लक्षांत घ्यायला सुद्धां दामिनीला फुरसत सांपडलेली नव्हती. किंवा कदाचित् असें असेल कीं दुसऱ्या दिशेकडून डोळे दिपवून टाकणारा प्रकाश तिच्या डोळ्यांवर येत राहिल्यामुळें तिला अंधारल्यासारखें झालें असेल. पण आतां तिच्या भोंवतालच्या जगाचा संकोच होत होत माझ्याशिवाय तिला कोठें जगच शिल्लक राहिलें नाहीं. त्यामुळें आतां माझ्याकडे जरा लक्षपूर्वक आणि जाणत्या डोळयांनीं पाहण्यावांचून तिला इलाजच राहिला नाहीं. बाकी अशा या स्थितींतच तिला माझें प्रथम दर्शन घडवून आणण्यांत माझ्या दैवानें मोठी मेहेरबानीच माझ्यावर केली असेंही एका अर्थी म्हटलें पाहिजे.

लीलानंदांच्या भजनी मेळयामध्यें असतांना या दामिनीच्या बरोबर दऱ्याखोऱ्यांतून, समुद्रकांठीं किंवा नदीतीरावर मी कितीतरी भटकलों होतों; ढोलकी आणि टाळ यांच्या तालावर उत्कृष्ट भावपूर्ण गीतें गाऊन सारें वातावरण भक्तिरसानें आम्ही कसें धगधगीत करून टाकीत होतों. "माझें हृदय प्रेमाच्या ग्रंथीनें तुझ्या चरणांशीं बांधलेलें आहे" या अर्थाचें वैष्णव कवि चैतन्याचें पालुपद निरनिराळ्या स्वरांत गातांना भावनेचे प्रखर स्फुल्लिंग आम्ही चौफेर फेंकीत होतों जणुं. इतक्या या विकारी वातावरणांतसुद्धां ज्यामुळें दामिनीला मी दिसूं शकतों असा तो तिच्या डोळ्यांपुढील पडदा कांहीं तिळमात्रसुद्धां जळून गेला नव्हता.

आणि आतां या कलकत्त्यांतल्या या बोळांतच असा काय एवढा चमत्कार घडून आला असावा पहा! या इथें तर सगळीं काळोखी घरें एकाशीं एक नुसतीं अशीं खेचून उभीं आहेत कीं, घड श्वास घ्यायलासुद्धां सवड नाहीं माणसाला. पण तीच आतां आम्हांला नंदनवनांतील बहरलेल्या फुलासारखी वाटूं लागली. खरोखर परमेश्वरानेंच अत्यंत कनवाळू वृत्तीनें आमच्या जीवनांत हा चमत्कार दाखविला असला पाहिजे. या दगडाधोंड्यांच्या बांधकामालाच जणुं आपल्या सारंगीची तार बनवून तिच्यांतून आपलें दिव्य संगीत त्यानें आपल्या भोंवतीं पसरविलें. आणि आपल्या जादूच्या कांडीचा स्पर्श करून त्यानेंच माझ्यासारख्या एका यःकश्चित् माणसाला केवढा तरी महान् पुरुष बनविलें.

मध्यें पडदा उभा आहे तोंपर्यंत विरहामधलें अंतर किती अमर्याद भासतें. पण पडदा वर गेला कीं हेंच अमर्याद अंतर डोळ्याचें पातें ओलांडून टाळतां येतें. आमच्यामधील अंतरही असेंच एका क्षणांत तुटलें. दामिनी त्या वेळीं म्हणाली, "खरोखर मी जणुं स्वप्नांत होते. त्या स्वप्नातून जागी व्हायला या एवढ्या आघाताची गरजच होती मला. त्या वेळचे माझे तुम्ही आणि आजचे माझे तुम्ही यांच्यामध्यें केवढा मोठा तरी मोहाचा पडदा उभा होता. माझ्या गुरुरायानेंच हा पडदा दूर केला; म्हणून त्याच्या चरणीं पुनःपुन्हां मी वंदन करते."

" दामिनी " मीं तिला म्हटलें, " अशी टक लावून माझ्याकडे बघत राहूं नको. यापूर्वी परमेश्वराच्या घरचा हा गरीब बिचारा प्राणी सुंदर नाहीं असा तुझा शोध होता; त्या वेळीं तुझी नजर मी सहन करूं शकत होतों; पण आतां मात्र ती सहन करणें मला कठिण होणार आहे."

" आतां मात्र मी असा शोध लावते आहे " दामिनीनें उत्तर दिलें कीं, " परमेश्वराच्या या कृतीच्या ठिकाणीं पण स्वतःचें कांहीं विशेष मधुरत्व आहे. "

" तर मग तुझें नाव इतिहासांत अजरामर होणार, दामिनी ! " मी उद्गारलों. " दक्षिण ध्रुवावर जाऊन कोणा शोधकानें आपल्या शोधाच्या निदर्शक निशाण लावून यावें ही गोष्ट सुद्धां तुझ्या या शोधाच्या मानानें निव्वळ पोरखेळाची समजली पाहिजे. तुझ्याकडून कठिण शोध लागला असें म्हणून भागणार नाहीं. अशक्य गोष्ट तूं प्रत्यक्षांत शक्य करून दाखविली आहेस असेंच तुझ्या शोधाचें वर्णन करायला हवें. "

वसंत ऋतूंतील फाल्गुन महिना किती लहान असतो हें आजपर्यंत कधींही माझ्या लक्षांतच आलें नव्हतें. आतां मला समजलें कीं या महिन्यांत दिवस फक्त तीसच असतात. आणि प्रत्येक दिवस झाला तरी चोवीस तासांहून एक मिनिटसुद्धां मोठा नसतो. वास्तविक परमेश्वराच्या घरीं काळाचें केवढें अनंत भांडार खुलें आहे. तेथें त्यानें या महिन्याच्या बाबतींत इतका कंजूषपणा कां करावा हें कांहीं मी समजूं शकलों नाहीं.

" तुम्हांला ही जी वेडेपणाची लहर आली आहे, " दामिनी म्हणाली,

" त्याबद्दल तुमचीं माणसें तुम्हांला काय म्हणतील याचा तुम्हीं कधीं विचार केला आहे का ? "

" माझ्या माणसांचे आणि माझे संबंध फारच प्रेमाचे आहेत. त्यामुळें ते मला घरांतून बाहेर हाकलून देतील हें निश्चित. "

" मग पुढें ? "

" मग काय, तुला आणि मला, दोघांनाच आपलें घर अगदीं पाया-पासून नवें थाटायला हवें. त्यांत सगळी कलाकुसर केवळ आपल्या दोघांची. इतर कोणाला त्याच्या निर्मितीचें कांहीं श्रेय नाहीं. "

" तुमच्या घराची मालकीणसुद्धां अशीच तुम्हांला अगदीं पहिल्या-पासून ठाकून ठोकून नवी घडवावी लागेल. ती पण अगदीं सर्वस्वी हातचीं बनवून घ्या. तिच्या ठिकाणीं मागच्या पडझडीची एवढी खूण सुद्धां शिल्लक राहूं देऊं नका. "

पुढच्याच महिन्यांत आम्हीं लग्नाचा मुहूर्त ठरविला. दामिनीचा आग्रह पडला, कीं सतीशला लग्नाला आणलेंच पाहिजे.

" त्याचं काय काम ? " मीं विचारलें.

" त्यांनीं माझा हात तुमच्या हातीं दिला पाहिजे. "

कोठें भटकत होती भ्रमिष्ट स्वारी याची मला कांहींच कल्पना नव्हती. आतांपर्यंत मीं त्याला किती तरी पत्रें लिहिलीं होतीं. पण एकाचें सुद्धां उत्तर त्यानें पाठविलें नव्हतें. बाकी त्यानें तें भुतटकीचें घर बहुतेक सोडलेलें नव्हतें. कारण नाहीं तर मग माझीं पत्रें मालक मिळत नाहीं म्हणून परत आलीं असतीं. हजार हिश्शांनीं माझीं पत्रें फोडून पाह्यलाही त्या स्वारीला फुरसूद झाली नसेल. "

" दामिनी " मी म्हणालों, " माझ्याबरोबर तूं स्वतः येऊन त्याला बोलावणें केलें पाहिजे. नुसतें औपचारिक पत्र पाठवून कांहीं या कामांत चालायचें नाहीं. मी एकटा गेलों असतों; पण आपली कांहीं हें काम एक-ट्यानें उरकण्याची छाती नाहीं. कुणी सांगावें, ही स्वारी बहुधा नदीपली-कडे बदकें आपले पंख साफ करीत बसतात त्यांचें निरिक्षण करीत बसलेली असायची. त्या ठिकाणीं त्याला जाऊन गांठणें म्हणजे मोठीच धाडसाची गोष्ट आहे. ती तुझी तूंच करूं जाणे."

दामिनीनें स्मित केलें. " 'पण त्या ठिकाणीं येऊन मी पुन्हां तुमचा पाठपुरावा करणार नाहीं' असें वचन दिलेलें नाहीं का मीं त्यांना!"

" खायला घेऊन मी या ठिकाणीं तुमच्याकडे येणार नाहीं असें वचन तूं दिलें आहेस. पण त्याला घरीं पोटभर मेजवानीला बोलवायला जाणार नाहींस असं कांहीं तूं त्याला कबूल केल्यासारखं यातं होत नाहीं.

८

या वेळीं सगळया गोष्टी अगदीं सुरळित पार पडल्या आम्हीं दोघांनीं सतीशचा एकेक हात धरून आमच्याबरोबर त्याला कलकत्त्याला आणलें. नव्या बाहुल्यांची जोडी मिळाल्यामुळें लहान बालकाला आनंद व्हावा तसा आणि तितका आनंद त्याला झाला होता.

आमचा विचार असा होता कीं, लग्न कांहीं गाजावाजा न करतांच उरकून घ्यावें. पण सतीश कांहीं तें मुळींच ऐकेना. त्याला साथ द्यायला जगमोहनकाकांचें तें जुनें मुसलमान चांभार स्नेहीमंडळ होतेंच. त्यांच्या कानावर आमच्या लग्नाचा विचार गेला तेव्हां ते तर आनंदातिरेकानें नाचूं लागले; तें पाहून शेजाऱ्यापाजाऱ्यांना वाटलें असावें कीं काबूलच्या अमीराची, नाहीं तर निदान हैदराबादच्या निजामाची तरी ही शादी असली पाहिजे. परंतु ही बातमी समजतांच वर्तमानपत्रांनीं नालस्तीची जी जी बेहोष मैफल सुरू केली तिनें तर आमच्या मुसलमान बंधूंनीं मांडलेल्या थैमानाच्या वर ताण केली. पण आमचीं अंतःकरणें आनंदानें इतकीं फुलून निघालेलीं होतीं कीं या नालस्तीबद्दल रागाला अवसरच आमच्या अंतःकरणांत मिळूं शकत नव्हता. वर्तमानपत्राच्या वाचकांची रक्ताची तहान आमच्यामुळें भागत असेल तर भागवूं देण्याला आमची कांहीं हरकत नव्हती, त्याचप्रमाणें वर्तमानपत्राच्या चालकांच्या खिशांत त्यामुळें थोडीशी भर पडूं देण्यालाही आमची हरकत नव्हती. उलट हवे तर आमच्या आशीर्वादाची भरही आम्हा थोडीशी त्यामध्यें घालायला तयार होतों.

सतीश म्हणाला, "विश्री, गड्या, माझ्या घरांत येऊन राहा ना तूं."

"तर मग तूं पण आमच्या बरोबर ये," मी म्हणालों. "पुन्हां आपण हातांत हात घालून आपल्या कार्याला लागूं या पहिल्यासारखे."

" छे ! तें नाहीं जमायचें. " सतीश म्हणाला. " माझें कार्य अन्य ठिकाणीं आहे. "

" पण आमच्या गृहप्रवेशाच्या कामांत तुमची मदत हवी आम्हाला. तो झाल्याशिवाय आम्हीं तुम्हांला जाऊं देणार नाहीं. " दामिनीनें आग्रह धरला.

या समारंभाला कुणाची कसली गर्दी व्हायची नव्हती. बाहेरचा पाहुणा एक सतीशच तेवढा होता. बाकी " माझ्या घरांत येऊन राहा " असें सतीशला नुसतें म्हणायलाच तेवढें सोपें होतें. कारण सतीशच्या घरांत आमच्या आधींच हरिमोहनांनीं आपले हातपाय पसरले होते. म्हणजे ते कांहीं स्वतः त्या भागांत नव्हते राहात. तर आपल्या वतीनें त्या भागांत त्यांनीं एक भाडेकरू ठेवला होता. हरिमोहन बाबू स्वतः सुद्धां त्या घरांत राहिले नसते असें नव्हे. परंतु त्यांच्या व्यवहारी आणि पारमार्थिक सल्लागारांनीं त्यांना तसें करूं नका म्हणून भीति घातली होती—हो एक मुसलमान माणूस तेथें प्लेगनें मेलेला ! तेव्हां कशाला उगीच विघाची परीक्षा पाहा. अर्थात् त्या ठिकाणीं जो भाडेकरू आला त्यालाही पारलौकिक आणि शारीरिक धोका हरिमोहनांपेक्षा कमी थोडाच होता. परंतु त्याला त्यांतलं कांहीं सांगितलेंच नाहीं म्हणजे झालें !

हरिमोहनांच्या कचाटयांतून आम्ही तें घर कसें सोडवून घेतलें याची हकिकत फार लांबलचक होईल. या कामीं ते मुसलमान चांभार आमचे प्रमुख साहाय्यक होते. त्यांच्या कानावर आम्ही जगमोहनबाबूंच्या मृत्युपत्रांतील शर्ती जेव्हां घातल्या तेव्हां आम्हांला इतर कसले कायदेशीर इलाज करण्याचे कारणच पडलें नाहीं.

घराहून मला आतांपर्यंत माझ्या खर्चासाठीं नियमित रक्कम मिळत असे, ती आतां बंद झाली. बाहेरची कुणाची मदत न घेतां केवळ आमच्या दोघांच्या संयुक्त श्रमांच्या जोरावरच आमचा संसार थाटण्याचें हें कार्य आम्हांला उलट अधिकच सुखकर वाटलें. प्रेमचंद रायचंद शिष्यवृत्तीचा छाप होता माझ्यावर. त्यामुळें एका कॉलेजांत प्राध्यापकाची जागा मिळायला कांहीं मला अडचण पडली नाहीं. शिवाय परीक्षांसाठीं नेमलेल्या पुस्तकावर टिपणीपुस्तकें वगैरे लिहूनही माझ्या मिळकतींत मी भर टाकूं

लागलों. परीक्षा पास होण्याचा रामबाण उपाय म्हणून विद्यार्थी या टिपणी-पुस्तकांवर नुसत्या उड्या टाकीत. खरं पाहिलं तर इतकी धडपड करण्याचं मला कांहींच कारण नव्हतं. कारण आमच्या गरजा अगदीं थोड्या होत्या. पण दामिनीचा आग्रह पडला कीं आपण जिवंत आणि समर्थ आहोत तोंपर्यंत सतीशला कशांत कांहीं कमी पडतां कामा नये.

त्यातच आणखी एक गोष्ट होती भरीला. त्याबद्दल दामिनीनें कधींच तोंडावाटें शब्द काढला नाहीं; आणि म्हणूनच ती गोष्ट मी तिला न कळवितांच करीत होतों. ही गोष्ट म्हणजे तिच्या भावाच्या मुलाचें शिक्षण आणि तिच्या भावाच्या मुलीचें लग्न. या दोन्ही गोष्टी तिच्या भावाच्या आटोक्याबाहेरच्या होत्या. त्याच्या घरीं आम्हांला जायला मज्जाव होता; कारण आम्ही जातिबहिष्कृत; पण आर्थिक मदत स्वीकारायला जातगंत कधीं आडवी येत नसते. शिवाय अशी मदत घेतली म्हणून कबूल करायचें कारण थोडेंच आहे! यासाठीं माझ्या इतर व्यवसायांच्या जोडीला एका वर्तमानपत्राच्या दुय्यम संपादकाचें कामही मला पत्करावें लागलें.

दामिनीला न विचारताच मी एक स्वयंपाकी आणि दोन नोकर कामावर ठेवले. मला न विचारतां दामिनीनें दुसऱ्याच दिवशीं त्यांना घरा-बाहेर घालवून दिलें. मी तक्रार केली यावद्दल तेव्हां तिच्यासाठीं म्हणून जें हें मी सारें करीत होतों त्यांत माझी केवढी चूक होत होती हें तिनें मला समजावून दिलें. ती म्हणाली, " तुम्ही तिकडे सारा दिवसभर हमाला-सारखे राबतां आहां, आणि मला मात्र माझ्या हिश्शाचे काम करूं देत नाहीं. असं केलंत तर शरमेनं मला हें तोंडसुद्धां कुठें दाखवायला नको असं म्हटलं पाहिजे."

माझें बाहेरचें काम आणि दामिनीचें घरांतलें काम यांचा प्रवाह जणुं गंगायमुनांच्या संगमाच्या प्रवाहाप्रमाणें चालू झाला. दामिनीनें त्याशिवाय त्या शेजारच्या चांभारांच्या मुलींना शिवणकाम शिकवायला सुरुवात केली. कामाच्या बाबतींत मला मुळींच हार जायचें नाहीं असा जणुं तिनें निश्चयच केला होता. या अशा कार्यक्रमात आमचें तें कलकत्त्यांतलें घर प्रत्यक्ष वृंदावनच कसें झालें, आणि आमच्या श्रमरूपी वेणूच्या मधुर ध्वनीनें भारून जाऊन त्या घरांत आनंदाचा स्वर्ग कसा निर्माण झाला हें

रसाळपणें पुष्कळ सांगावेंसें वाटतें मला; पण तेवढी कवित्वशक्ति माझ्या-जवळ आहे कोठें ? मी एवढेंच म्हणूं शकेन कीं आमचे दिवस आम्हांला मुळींच कंटाळवाणे झाले नाहींत; एकामागून एक आमचे दिवस नुसतें साध्या चालीनें चालत नव्हते; तर खरोखर हर्षानें नाचत नाचतच त्यांचें मार्गक्रमण चालू होतें.

असा आणखी एक वसंतसमय येऊन गेला. पण तोच अखेरचा ठरला.

त्या गुहेंतल्या देवळांतून परत आल्यापासूनच दामिनीला छातींत दुखण्याची व्यथा जडलेली होती; पण त्या वेळीं तिनें कोणालाच कांहीं सांगितलें नव्हतें. तेंच दुखणें आतां एकदम एकाएकीं विकोपाला गेलें. याचा अर्थ काय म्हणून विचारतां ती म्हणाली, " हा माझा गुप्त निधि आहे; माझा कसोटीचा दगड आहे. ही वरदक्षिणा तुम्हांला द्यायला मजजवळ होती म्हणून तर मी तुमची वधू म्हणून तुमच्यापाशीं येऊं शकले. नाहीं तर मला ही योग्यता प्राप्तच होण्यासारखी नव्हती. "

पुष्कळ डॉक्टर आणून झाले.प्रत्येकाचें दुखण्याचें नांव आणि निदान निराळें; औषधयोजना पाहावी तर तीही प्रत्येकाची वेगळी. एका बाजूनें डॉक्टरांचीं आणि दुसऱ्या बाजूनें औषधविक्यांचीं बिलें अशा दुतर्फा माऱ्यांत माझी लहानशी पुंजी तेव्हांच संपून गेली. तेव्हां मग डॉक्टरांनीं औषधाचें प्रकरण संपविलें आणि हवा बदलण्याचा सल्ला दिला. आणि तसें पाहिलें तर आतां बाहेरच्या हवेशिवाय देण्याघेण्याच्या उपयोगाची किंमती वस्तु आमच्या जवळ दुसरी कोणती शिल्लकच नव्हती.

" ज्या ठिकाणाहून हें दुखणें मी आणलें त्याच ठिकाणीं मला घेऊन चला. " दामिनी म्हणाली, " तेथें हवेला कांहीं तोटा नाहीं. "

माघी पौर्णिमा होऊन गेली आणि कृष्णपक्ष सुरू झाला होता; आपल्या अनादि आणि अनंत अशा एकाकी जीवनाबद्दल समुद्र मोठमोठे उसासे टाकीत होता; अशा वेळीं दामिनीनें माझ्या पायाची धूळ आपल्या कपाळाला लावून माझा अखेरचा निरोप घेतला. जातां जातां ती म्हणाली, " आपला सहवास मला पुरेसा प्राप्त झाला नाहीं. पुढल्या जन्मीं आपलीच जोड मला लाभो एवढीच माझी अखेरची इच्छा आहे. "

**समाप्त**